






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






७४९२

१-२-३-४

वर्ष २२ - १९४९-५०
अं. ९० - ९१ - ९२ - ९३

म. सा. प. १९४९ - ५०

संपादक - यशवंत दिनकर पेंढरकर

९० - वर्ष २२ वे, अंक १ ला - एप्रिल - जून १९४९
९१ - " " " २ रा - जुलै - सप्टेंबर १९४९
९२ - " " " ३ रा - ऑक्टोबर - डिसेंबर १९४९
९३ - " " " ४ था - जानेवारी - मार्च १९५०

जुलै - सप्टेंबर १९४९ - डांगी बोली
प्रा. रा. श्री. जोशी - खास पुरवणी

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक

७४९२

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका




वर्ष २२ वें : अंक १ ला

एप्रिल–जून १९४९



९०

ह्या शिवाय, शोकसमाचार, संपादकीय
स्फुटें, परिषद्वार्ता, संमेलनांतील
ठराव, नवीन सभासद,
साभार-स्वीकार,
इत्यादि.

संपादक :
यशवन्त दिनकर पेण्ढरक

अनुक्रमणिका



❀ महाराष्ट्र ❀
साहित्य-पत्रिका
वर्ष २२ वें : अंक १ ला
एप्रिल — जून १९४९



## स्वभावें—

" पाखडसी कां प्राण ? कुणाचीं इतुकीं चिंतिसि हितें ?
कशाला संमार्जन शोणितें ?
' आपुलेंच तें खरें ' असें गा म्हणणाऱ्यांच्या जगीं
तपस्या होय तुझी वावुगी !"

मनास हें बोधितों, परंतु तया कुठें राहवे ?
स्वभावें तरुराजी पालवे.
खुल्या शिंपल्यांस्तव अडती कां पर्जन्याच्या सरी ?
कुठेंही कोसळती भूवरी.
जें उचंबळोनी येतें हृदयान्तरीं
तीं फुलें प्रगटतीं पारिजातकावरी
घालणें तयांची पखरण भूमीवरी
कृतार्थ ह्यांतच तरु, न करी क्षिति जाती किति राउळीं
किती वा चुरती जन पदतळीं

—यशवन्त

अनुक्रमणिका

# कालिदासाची वनश्री :

ले०— डॉ. म. वि. आपटे,
बी. एस्सी.; एम्. बी. बी.एस्.
कैवल्यधाम, लोणावळें.

कालिदास वाङ्मयापैकीं कुमारसंभव या एकाच ग्रंथाचा विचार आता करावयाचा राहिला आहे. या काव्यांत नवीन उद्भिदांचे उल्लेख पांचच आहेत. त्यांपैकी एक वृक्ष, दोन क्षुपें आणि दोन तृणें आहेत. वृक्षाचें नांव **प्रियाल**, क्षुपांचीं नांवें **सिंधुवार** आणि **सिद्धार्थ**, आणि तृणांचीं **वर्हि** आणि **मौंजी** हीं आहेत. प्रियालाचा उल्लेख शंकराच्या तपोभूमीच्या वर्णनांत आहे. सिद्धार्थाचा उल्लेख तसाच आहे. फरक इतकाच कीं पहिलें वर्णन शिवपूजेला चाललेल्या पार्वतीचें आहे आणि दुसरें वर्णन तिच्या विवाहसिद्धतेचें आहे. बर्हि या तृणाचा उल्लेख विवाहपूर्व शिवसेवेच्या संबंधीं आलेला आहे आणि मौंजी या तृणाचा उल्लेख पार्वतीच्या तपश्चरणासंबंधांत आलेला आहे.

कवि सांगतो कीं हिमालयाच्या राजधानीच्या जवळच्या वनांत शंकर तपश्चर्येला बसले होते. तेथे पार्वती त्यांची सेवा करी. तेथें मदन प्रकटलेला पाहून त्यांनीं त्याला जाळला आणि आपण तेथून नाहीसे झाले. नंतर गौरीशिखरावर जाऊन पार्वतीने तप केलें. तेथे शंकर तिला पावले. पुढे हिमालयाच्या राजधानींतील घरीं विवाह झाला. गंगाप्रवाहोक्षितदेवदारु ( सर्ग १. ५४ ) असें शिवाच्या तपोभूमीचें वर्णन कवीने केलें आहे. त्यावरून गंगेच्या काठीं देवदारु असलेला जो वनप्रदेश आहे त्याला उद्देशून हीं वर्णनें आहेत हें ध्यानांत येतें.

मृगाः प्रियालद्रुममंजरीणां रजःकणैर्विघ्नितदृष्टिपाताः ।
मदोद्धताः प्रत्यनिलं विचेरुः वनस्थलीर्मर्मरपत्रमोक्षाः ॥ ३. ३१

प्रियालाच्या मंजिरांतून उधळणाऱ्या परागामुळे दृष्टीला अडथळा होत असतांहि हरिण वाऱ्याविरुद्ध वनभूमीवर हिंडत होते.

येथे प्रियाल म्हणजे राजादन असें अमरावरून मल्लीनाथ म्हणतो. प्रियाल म्हणजे चारोळी असा एक अर्थ रूढ आहे.राजादन म्हणजे रांजण (अहमदाबादी मेवा) हें एक बकुलगणांतलें झाड आहे. याला बकुलाप्रमाणेंच एका पानाच्या बगलेंत अनेक पण स्वतंत्र पुष्पें येतात. त्यांना मंजिरा म्हणता येत नाही. चारोळी हा वृक्ष मात्र आम्रगणांतला आहे. त्याला आंब्याच्यासारख्या मंजिरा येतात. कवीनें प्रियालाची मंजिरी सांगितली असल्यामुळे प्रियाल म्हणजे चारोळी असें म्हणणेंच योग्य ठरतें.

[ प्रियाल Buchnania longifolia Bl. १ ]

मुक्ताकलापीकृत **सिंधुवारं** वसंतपुष्पाभरणं वहन्ती । ( पार्वती ) ३.५३.

पार्वतीनें वसंतपुष्पांचे अलंकार धारण केले होते. त्यांत सिंधुवाराचा उपयोग मोत्यांच्या माळेप्रमाणें केला होता.

सिंधुवार म्हणजे निर्गुडी. निर्गुडीला लांब लांब मंजिरा येतात. त्यांत मोत्यासारख्या बारीक बारीक कळ्या आणि कांहीं उमललेलीं फुलें असतात. तीं निळसर असून मुखद्युति असतात.

निर्गुडी झुडुप आणि मोठा वृक्ष या दोनहि स्वरूपांत आढळते.

[ सिन्धुवार Vitex nirgundo L. २ ]

सा गौरसिद्धार्थ–निवेशवद्भि र्दूर्वाप्रवालैः प्रातिभिन्नशोभम्।
निर्वाभिकौशेयमुपात्तबाणं अभ्यंगनेपथ्यमलंचकार ॥ ७.७

पार्वतीने स्नानापूर्वी जो वेश केला होता त्याला तिच्या स्वतःच्या अंगाने विशेष शोभा आली होती. तिचें रेशमी उत्तरीय नाभीच्या खाली कमरेस अडकवलेल्या बाणापर्यंत पोचलें होतें. दूर्वांकुर आणि त्यामधून गोवलेलीं मोहरीचीं फुलें यांनीं त्याची शोभा वाढली होती.

येथें मोहरीला सिद्धार्थ म्हटलें आहे. त्यावरून हें पीक वन्यापासून लागवडीने तयार केलें होतें असें सूचित होतें.

[ सिद्धार्थ Brasica alba ३ ]

अवचित बलिपुष्पा वेदिसंमार्गदक्षा नियमविधिजलानां बर्हिषां चोपनेत्री ।
गिरिशमुपचचार प्रत्यहं सा सुकेशी नियमितपरिखेदा तच्छिरश्चंद्रपादैः ॥ १.६०

पार्वती शिवपूजेकरिता फुलें गोळा करी, दक्षतेने वेदी झाडून काढी, व्रताकरतां लागणारें पाणी आणि बर्हि आणी. याप्रमाणें ती प्रतिदिनीं शिवाची सेवा करी. शिवाच्या डोक्यावरील चंद्राच्या किरणामुळे तिला या सेवेत होणाऱ्या श्रमांचा परिहार होत असे।

बर्हि या शब्दाचा अर्थ कुश असा मल्लीनाथाने दिला आहे.

प्रतिक्षणं सा कृतरोमविक्रियां व्रताय मौंजीं त्रिगुणां बभार याम्। ५. १०

तीन–पदरी मौंजी तिने आपल्या कमरेला बांधली. ती खुपत असल्यामुळें तिच्या अंगावर क्षणोक्षणी कांटा उभा राही.

कालिदासवाङ्मयांत आढळणाऱ्या सर्व उद्भिदांचे उल्लेख येथवर विवेचिले आहेत. त्यांची संख्या शताधिक आहे. एकेकाचे उल्लेख अनेक वेळा आलेले आहेत. ते सर्व लक्षांत घेऊन अर्थविनिश्चय केला आहे. उद्भिदांची अभिव्यक्ति केली म्हणजे वनश्रीचें विवेचन पूर्ण झालें असें नाही. वनभूमि, तदाश्रयी आणि तत्संबंधी पशुपक्षी इत्यादींचें विवेचन त्याबरोबरच करावयास पाहिजे. वनभूमि, उद्भिद, पशु, पक्षी, आकाश, अन्तरिक्ष, मिळून वनश्री सिद्ध होते. त्या सर्वांचें संकलित वर्णन कालिदासाने कुमारसंभवकाव्याच्या आठव्या सर्गांत केलें आहे. या सर्गांतील ९१ श्लोकांपैकीं ५० श्लोक वनश्रीवर्णनात्मकच आहेत. इतकें विस्तृत आणि मार्मिक वर्णन अन्यत्र आढळत नाहीं. तथापि या गोष्टींचा भरपूर परामर्श घेण्यास येथें अवकाश नाहीं. म्हणून हा विषय येथेंच संपाविणें भाग आहे.

## उपसंहार

म. सा. पात्रिकेच्या ८४ व्या अंकांत रघुवीरप्रणीत आणि करवे-भाषांतरित असा जो ' वनस्पतींचें नामकरण ' या नांवाचा लेख प्रसिद्ध झाला त्याच्या चर्चेतून प्रस्तुत लेखावली निर्माण झाली. पहिल्या लेखांत ( अंक ८६ ) असें प्रतिपादन केलें कीं औद्भिद परिभाषा भारतीय भाषांत संस्कृतावरून तयार केली पाहिजे हें रघुवीरांचें म्हणणें मान्य करण्याजोगें आहे. परंतु रघुवीरांनी जी उद्भिदगणांची नामावलि दिली आहे तिजवरून नाममालिका सिद्ध व्हावयाची नाही. कारण त्यांनी गणनामें जातिनामावरून घेतलेलीं असून जातिनामेंच संस्कृत-वाङ्मयांत अपुरीं आहेत. शास्त्राला स्थलमर्यादा घालणें इष्ट नव्हतें. आपणाला सर्व उद्भिदांना नांवें द्यावयाचीं आहेत. त्यांतलीं नुसतीं पुष्पवंतच घेतलीं तरी तीस चाळीस हजार आहेत. त्यांतली प्रथम परिचयाकरता केवळ भारतीय घेऊ म्हटलें तरी तीं दहा हजार आहेत. त्यांतलीं अवघीं एक हजार संस्कृत वाङ्मयांत आढळतात. उर्वरितास नांवें कशीं द्यावयाचीं ?

हा प्रश्न रघुवीरपद्धतीनें सुटत नाही, शिल्लकच राहतो. तो सोडविण्याकरता तात्त्विक विचार म्हणून कांही नामांची व्युत्पत्ति सांगितली आणि आधुनिक परिभाषेचें या संबंधाचें धोरण सांगून आपणाला तें कसें अनुसरतां येईल या विषयीं कांही उदाहरणें दिलीं.

उद्भिदांचे गण, गोत्र, आणि जाति ठरवून त्यांना नांवें देणें हा उद्योग महत्त्वाचा खरा, परंतु तो त्यांच्या अंगोपांगांच्या रचनाविवेचनाशिवाय हातीं घेता येण्याजोगा नाही. म्हणून अंगोपांगांच्या विवेचनास उपयोगी पडणारी परिभाषा अगोदर सिद्ध केली पाहिजे हें जाणून म. सा. प. च्या पारिभाषामंडळानें ती इंग्रजी-मराठी कोशाच्या रूपानें प्रसिद्ध केले-लीच आहे. तिचा परामर्ष रघुवीरांनीं घेतलेला दिसत नाही. या कोशाच्या प्रती संपलेल्या असल्यामुळें त्याची दुसरी आवृत्ति काढण्याची तयारी चालू आहे. या नव्या आवृत्तींत ब्रिटिश ज्ञानकोशांतील निबंधांच्या धरतीवर लिहिलेले निबंध द्यावयाचे आहेत. मूळ, खोड, पान, फूल, फळ, या पांच अंगांना उद्देशून, त्यांवरून वर्गीकरण प्रतिपादन करण्यास उपयोगी पडेल असा, एक निबंध लिहिलेला असून तो या नव्या आवृत्तींत द्यावयाचा आहे.

पत्रिकेचे अंक ८७, ८८, ८९ यांमध्यें कालिदासाची वनश्री या विशिष्ट विषयावर निबंध लिहिला त्याच्या तीन उद्देशांपैकीं एक उद्देश या वाङ्मयांत परिभाषासामग्री कोणती मिळण्याजोगी आहे तें दाखवणें हा आहे. आयुर्वेदवाङ्मयांत एक हजार उद्भिदांचीं नांवें आहेत, आणि थोडीबहुत वर्गीकरणाची छटाहि आहे, परंतु रूपवर्णनें असावींत तशीं त्या वाङ्मयांत नाहीत. तीं काव्यवाङ्मयांतच अधिक चांगलीं आढळतात. त्यांच्या योगानें उद्भि-दांच्या जातींची अभिव्यक्ति होते आणि शास्त्ररचनेस लागणारी आरंभिक सामग्रीहि मिळते. सर्व काव्यांत कालिदासकाव्य श्रेष्ठ आहे हे सर्वमान्य आहे. निसर्गवर्णनाच्या बाबतीत तें दोष-पूर्ण आहे असें कांही विद्वानांचें म्हणणें आहे * परंतु तें सर्वथैव चुकीचें आहे हें दाखविण्या-करितां त्यांतील सर्वच्या सर्व उद्भिदांचें विवेचन येथवर केलें. यासंबंधीं आणखी पुष्कळ लिहि-ण्याजोगें आहे, आणि लिहिलेंहि आहे. त्याच्या प्रकाशनाचा भार पत्रिकेवर घालणें इष्ट नाही. म्हणून सर्व सविस्तर लिखाण टिळक महाराष्ट्र विद्यापीठाकडे प्रसिद्धीकरतां पाठविलें आहे.

परिभाषा सिद्ध झाली, तिची पूर्वपीठिका सांगितली तरी तिचा शास्त्रीय वाङ्मयांत विनियोग राहतोच. तो करून एक लेखमाला लिहिली असून ती सृष्टिज्ञान नामक मासिकांत प्रसिद्ध होत आहे. आधुनिक शास्त्रीय वाङ्मयाचा विस्तार पाहिला म्हणजे तत्तुल्य वाङ्मय मराठींत तयार होणें ही गोष्ट अशक्यप्राय आहे असें मानणारे विद्वान आहेत. त्यांना स्वतः-ला हा उद्योग करवत नाही, आणि दुसरा कोणी तो करूं लागला तर तो राष्ट्रीय प्रगतीला बाधक होईल अशी भीति ते प्रकट करतात. परंतु ही भीति अनाठायीं आहे एवढें सिद्ध झालें तरी या उद्योगाचें सार्थक झालें असें होईल.

## वाचकांचे विचार

या निबंधासंबंधीं कांही जणांनी समक्ष आणि कांहीं जणांनी पत्रद्वारें आपले विचार प्रकट केले आहेत. त्यांस अनुलक्षून दोन गोष्टी लिहिल्या पाहिजेत. सांगलीचे रा. हरि केशव

(१) Pleasures and privileges of the pen
by N. C. Kelkar Pages, 51-52.
(२) ऋतुसंहारम् by S. D. Gajendragadkar
and A. B. Gajendragadkar
introduction Page XXII Notes Page 485,

गोळे लिहितात कीं (१) वांगें हा शब्द वंग या देशनामावरून निघाला (२) नरी = दाणेदार साल. नरी+अंग नारिंग. (३) मिरची दक्षिण अमेरिकेंतील चिली प्रदेशातून लंकाद्वारे आपल्या कडे आली. इंग्रजींत 'चिली' आणि बंगालींत 'लंका' हे शब्द मिरची या अर्थी रूढ आहेत. (४) मिऱ्याची प्रतिनिधि ती मिरची. मान्य आहे.

मुंबईचे रा. र. य. जोशी लिहितात कीं शेफालिका म्हणजे पारिजात. यासंबंधी विवेचन अंक ८९ मध्यें पारिजाताविषयीं लिहितांना केलें आहे.

वाईचे रा. कृ. गं. अभ्यंकर लिहितात कीं:—(१) नवमल्लिका ही नेवाळी असावी. (२)अतिमुक्ता ही बटमोगरा असावी. (३) रक्ताशोक म्हणजे सुरंगी असावी. यावर उत्तर असें की (१) नेवाळी हा शब्द नेपाळी या अर्थाचा दिसतो. नेवाळी ही कालिदासाच्या काळीं विंध्यात होती असें निश्चित समजलें तर हें मत स्वीकार्य आहे. (२) मोगरा बटमोगरा या वेली विशेष लांबवर पसरत नाहीत. अतिमुक्तलता तशी पसरणारी आहे. कुसर स्वभावतः आंब्यावर पसरलेली वनांत आढळते म्हणून तीच अतिमुक्तलता असावी असें पूर्व ग्रंथकारांनी ठरविलें आहे तें ठीक दिसतें. (३) रक्ताशोक आणि सुरंगी ही दोन वेगवेगळीं झाडें आहेत. सुरंगी Acnocarpus longifolia.

कांहीं वाचकांनी **बिस** आणि **मृणाल** या शब्दांच्या अर्थाची पृच्छा केली आहे. उत्तर असें:— बिस हा एक कमलप्रकार आहे. बिसाचें फूल कोठेहि काव्यांत वर्णिलेलें नाही, किंबहुना उल्लेखिलेलेंहि नाहीं.

**बिसकिसलयच्छेद** पाथेयवन्तः राजहंसाः । मेघदूत, पूर्व ११.

दंष्ट्रिणो वनवराहयूथपाः दष्टभंगुर**बिसांकुरा** इव । कुमार. ८·३५.

बिसाचे किसलय आणि बिसाचे अंकर असे उल्लेख असल्यामुळे बिस हा शब्द सबंध झाडाचा वाचक असला पाहिजे असें अनुमान निघतें. कमळाच्या जातीमध्यें एक जात अशी आहे कीं तिचीं फुलें अगदीं लहान कण्हेराच्या फुलाएवढीं असतात; किंबहुना त्याहूनहि लहान असतात. इतर कमळांच्या मानाने फुलें लहान असल्यामुळे त्यांचा उल्लेख कवि करीत नाही. तथापि त्यांचीं पानें त्यांचे दांडे, त्यांचे अंकुर, पशुपक्षांच्या भक्षस्थानीं पडतात; म्हणून त्या सबंधांत त्यांचा उल्लेख येतो. बिसाला संदलें प्रदलें तीन तीनच असतात. बिस— Brasenia peltata.

प्रियंवदे कस्येदं उशीरानुलेपनं **मृणाल**वन्ति च नलिनीपत्राणि नीयन्ते । शाकुंतल ३. १.

येथें मृणाल म्हणजे कमळाच्या पानाचा दांडा असा अर्थ स्पष्ट आहे. हाच शब्द फुलाच्या दांड्यालाहि लावलेला आढळतो.

समुद्धृताशेप**मृणाल**जालकं कृतं सरः सान्द्रविमर्दकर्दमम् । ऋ. १. १९

या ठिकाणी मृणाल हा शब्द सरसकट कमळाच्या पानाच्या आणि फुलांच्याहि दांड्याचा वाचक आहे हें उघड आहे. मृणालसूत्र असा शब्द वरचेवर येतो. कमळाचें पान किंवा फूल खुडलें असता दांड्यांतून तंतू निघतात. कमळाच्या दांड्यांत म्हणजेच मृणालांत हवेकरता पोकळ्या असतात आणि जलाकरताहि वाहिन्या असतात. मृणाल पाण्याबाहेर काढल्याबरोबर पाणी भराभर उडून जाऊन तें लवकरच सुकून जातें. यामुळे तें कोमलपणाचें प्रतीक मानलें जातें. त्याच कारणाने कमळाची सर्वच अंगें कोमल दिसतात.

मृणालिकापेलवमेवमादिभिर्व्रतैः स्वमंगं ग्लपयन्त्यहर्निशम्। कु. ६.

असें पार्वतीचें वर्णन केलेलें आढळतें. मृणाल या अंगवाचक शब्दापासून मृणालिका असा सबंध उद्भिदाचा वाचक शब्द तयार झाला.

बिभर्ति चाकारमनिर्वृतानां मृणालिनी हैममिवोपरागम्। रघु १६. ७

मृणालिनी = मृणालिका = नलिनी = कमलिनी.

आणखी एक वाचक पृच्छा करतात कीं:—पूग या शब्दाचा अर्थ सुपारी हा निश्चित आहे. सुपारीची झाडें नेहमी ताठ राहतात. फार झालें तर वाऱ्यानें मोडतात, पण वाकत नाहीत. असें असतां

प्राप्ता मुहूर्तेन विमानवेगात् कूलं फलावर्जित-पूगमालम्। रघु० १३.१७

या वचनांत तीं झाडें फलांनी वाकलीं होतीं असें कवि म्हणतो तें चूक नव्हे काय?

उत्तर असें की झाडें वाकलीं होतीं असें कवि म्हणत नाही. पूगमाला म्हणजे पूगफलें ज्यावर आधा लेली असतात तो फलबंध. ती फलधारण करणारी शाखा, तिच्या उपशाखा म्हणजे व्यक्तिशः फलें यांसह; असा अर्थ घ्यावा. पूगमाला म्हणजे झाडांची रांग नव्हे. फलबंध हे प्रथम पुष्पबंध असतात. ते ताठ असतात. फलधारणा झाल्यावर ते वाकतात. आंब्याची मंजिरी असते तशीच पूगाचीहि मंजिरी असते. ती लांबट असल्यामुळे तिला माला म्हटलें आहे. फलभाराने आंब्याचा पुष्पबंध वाकतो तसाच पूगाचाहि वाकतो. ही साधी निरीक्षणाची गोष्ट आहे. पुष्पासंबंधीं बध धातूचा उपयोग ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. उदाहरणार्थः—

हरितारुणचारुबंधनः कलपुंस्कोकिलशब्दसूचितः।
वद संप्रति कस्य बाणतां नवचूतप्रसवो गमिष्यति॥ कु. ४. १४.

येथें प्रसव = पुष्प.

वरील विवाद्य उदाहरणांत माला शब्दाचा अर्थ मंजरीवजा पुष्पबंध असा घ्यावा, आणि आवर्जित हें विशेषण मालेकडेच घ्यावें म्हणजे झालें. पूगमालांचा उल्लेख केला म्हणजे पूगवृक्षांचा उल्लेख अध्याहृत येतोच. तो तसा अध्याहृत ठेवणें काव्यास अनुकूलच आहे. प्रतिकूल नाही.

## आभार

या लेखमालेंत प्रकट झालेली उद्भिदाची अभिव्यक्ति करण्यामध्ये पुष्कळ साहाय्य, प्रा. हरि पुरुषोत्तम परांजपे यांनी केलें. गेल्या वर्षभर प्रतिमासीं दोनदा प्रतिप्रसंगीं तासभर आम्ही या विषयाची चर्चा करीत आलों आहों. इतकें असूनहि शास्त्रीय बारकाईला दिसून येण्याजोग्या कांही चुका या लिखाणांत राहून गेल्या आहेत. तथापि त्या एकंदर अभिव्यक्ति चुकावितील अशा नसल्यामुळे त्यांची शुद्धि येथें देत नाही. पुस्तक प्रसिद्ध करतांना शुद्धि केली जाईल. छपाईच्या चुका बऱ्याच आहेत. त्या वाचकास सहज उमजतीलच. गुरुवर्य रा. गोविंदराव मोडक आणि मित्रवर्य विष्णुपंत लिमये यांनी व्युत्पत्तिविषयक कांही सूचना केल्या आहेत. त्यांचा यथावकाश उपयोग केला जाईल. तसा तो थोडासा अगोदर केलाहि आहे. या ना त्या रीतीने अनेक स्नेहीजनांनी प्रस्तुत उद्योगांत साहाय्य केलें आहे. त्या सर्वांचा आभारी आहें.

—

# छंदःशास्त्र—
## वैदिक आणि लौकिक

लेखक
य. ग. फफे

(१)

वैदिक छंदांचें वास्तविक स्वरूप कशा प्रकारचें आहे, वैदिक छंदांची परिणति होऊन त्यांपासूनच लौकिक छंद म्हणजे जाति व वृत्तें यांची निर्मिति कशी झाली आणि लौकिक वृत्तांचें नामकरणहि वैदिक ऋचांतील विशिष्ट शब्दांवरूनच कसें करण्यांत आलें हें पाहणें हा प्रस्तुत लेखाचा विषय आहे. त्याच्या अनुरोधाने वैदिक छंदांचें स्वरूप कसें आहे हें प्रथम पाहूं.

संपूर्ण ऋग्वेद छंदोमय आहे; मग वैदिक ब्राह्मण वेद पठन करीत असतां, हें आपण पद्य ऐकत आहों असें सामान्य श्रोत्यांस प्रतीत कां होत नाही ? याचें एक कारण, वेद स्वरयुक्त म्हटला जातो व तो तसा म्हणण्यांत त्याचें छंदत्व लोपलें जातें, असें सांगतां येईल. ऋचांचें छंदत्व हें वेदाक्षरांवरील स्वरांवर अवलंबून नाही. या स्वरांचा छंदांशी कांही संबंध नाही, म्हणूनच पिंगलाने आपल्या छंदःशास्त्रांत या स्वरांचा नामनिर्देशहि केला नाही. जणुं काय वेदाक्षरांवर स्वर नाहींतच असें मानून त्याने वैदिक छंदांचें विवेचन केलें आहे. वेदाचें छंदत्व प्रतीत न होण्यास 'स्वरयुक्त म्हणणी' हें प्रमुख कारण आहेच,याशिवाय आणखी कांही कारणें आहेत कीं काय हेंहि पाहिलें पाहिजे.

ऋग्वेदांतील ऋचा छंदोमय असल्या तरी त्यांत अनियमितपणा फार आहे. ऋचेंत चार पाद असतातच असें नाही. तिच्या भिन्न पादांतील अक्षरसंख्या समान असतेच असें नाहीं आणि अक्षरसंख्या समान असली तरी त्यांतील लगावलि म्हणजे लघुगुरुक्रम समान असतोच असेंहि नाहीं. उलट तो क्वचित्‌च समान आढळतो. ऋचांचें छंदत्व प्रतीत न होण्यास हा अनियमितपणाहि कांही अंशीं कारणीभूत होतो.

वैदिक छंदांत असा अनियमितपणा असल्यामुळे त्यांचें लक्षण एका पादावरून होऊं शकत नाही.संपूर्ण ऋचेंतील केवल अक्षरसंख्येवरूनच तें करावें लागतें. वैदिक छंदांचीं नांवें व अक्षरसंख्या पुढील कोष्टकावरून कळून येतील.

| छंदोनाम | गायत्री | उष्णिक् | अनुष्टुप् | बृहती | पंक्ति | त्रिष्टुप् | जगती |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अक्षरसंख्या | २४ | २८ | ३२ | ३६ | ४० | ४४ | ४८ |
| छंदोनाम | अतिजगती | शक्करी | अतिशक्करी | अष्टि | अत्यष्टि | धृति | अतिधृति |
| अक्षरसंख्या | ५२ | ५६ | ६० | ६४ | ६८ | ७२ | ७६ |

येथें छंदोनामाखाली दर्शविलेल्या त्यांच्या अक्षरसंख्याहि अनेक ऋचांत एकादोहोंनी न्यून-अधिक असल्याचें आढळतें. अशा स्थळीं हें न्यूनाधिक्य दर्शविणारे विशिष्ट शब्द त्या त्या छंदोनामामागें जोडतात. एक अक्षर न्यून असेल तर **निचृत्**, एक अक्षर अधिक असेल तर **भुरिक्**, तसेंच दोन अक्षरें उणीं असतील तर **विराट्** आणि दोन अक्षरें अधिक असतील तर **स्वराट्** हे शब्द छंदोनामामागे जोडतात. यास अनुसरून 'निचृत् गायत्री' म्हणजे

तेवीस अक्षरी छंद होय. भुरिक् त्रिष्टुप् म्हणजे पंचेचाळीस अक्षरी छंद होय. असेंच सर्व छंदांसंबंधानें समजावें.

ऋग्वेदांत साडेदहा हजारांवर ऋचा आहेत. त्यांत त्रिष्टुप् छंदाच्या ऋचा सुमारें साडेबेचाळीसशें म्हणजे एकंदरीत सरासरी शेकडा एकेचाळीस आहेत. अर्थात् त्रिष्टुप् हाच ऋग्वेदांतील प्रमुख छंद होय. त्रिष्टुभाचे खालोखाल गायत्री छंदाच्या ऋचा सु. साडेचोवीसशें म्हणजे शेंकडा सु. साडेतेवीस आहेत. यापुढे क्रमानें येणारे छंद म्हणजे जगती शेंकडा १३ व अनुष्टुप् शेंकडा ८ असून बृहती, उष्णिक् व पंक्ति यांचें सरासरी शेंकडा प्रमाण अनुक्रमें ४, ४ व ३ पडतें. याप्रमाणें ऋग्वेदांतील शेंकडा ९७ ऋचा या सात छंदांच्या असल्यानें त्यांतील मुख्य छंद हेच सात होत आणि म्हणूनच पिंगलानें आपल्या छंदःशास्त्रांत हे सात छंद २–१४ या एका सूत्रांत सांगितले आहेत. जगतीहून मोठे छंद आणि बृहती,पंक्ति इत्यादिकांच्या संयोगानें होणारे, ज्यांस प्रगाथ म्हणतात ते, संयुक्त छंद हे सर्व मिळून ऋग्वेदांत अवघे सु० शेंकडा ३ इतक्या अल्प प्रमाणांत आलेले आहेत. यांचें सामान्य स्वरूप पुढे पहावयाचें आहेच.

वैदिक छंदांपासून कालांतरानें परिणत झालेलीं सुव्यवस्थित वृत्तें आपल्या परिचयाचीं असतात. त्यांस अनुसरून असें वाटण्याचा संभव आहे कीं, गायत्री छंद २४ अक्षरी असतो तेव्हा त्यांत षडक्षरी चार पाद असतील. पण अशी वस्तुस्थिति नाहीं. षडक्षर–चतुष्पाद गायत्री छंद क्वचितच येतो. उष्णिक् आणि बृहती यांसहि हीच गोष्ट लागू आहे. म्हणजे सप्ताक्षर –चतुष्पाद उष्णिक् आणि नवाक्षर चतुष्पाद बृहती छंद ऋग्वेदांत क्वचितच आढळतो. याचें कारण असें आहे कीं, ऋग्वेद हा बहुतांशी आठ, दहा, अकरा व बारा अक्षरी पादांनीच बनलेला आहे.म्हणून अष्टाक्षरी चार पादांनी होणारा अनुष्टुप् छंद, दशाक्षरी-चतुष्पाद पंक्ति, एकादशाक्षरी चार पाद असलेला त्रिष्टुप् छंद आणि द्वादशाक्षरी चार पादांचा जगती छंद हे चारच समानाक्षरी चार पाद असलेले छंद ऋग्वेदांत येतात. बाकीचे सारे छंद प्रायः अष्टाक्षरी व द्वादशाक्षरी पादांनीच झालेले आहेत. दशाक्षर-चतुष्पाद पंक्ति देखील थोड्याच आहेत. इतर पुष्कळ पंक्ति आठ व बारा अक्षरी पादांच्या मिश्रणानेंच बनलेल्या आहेत.

त्रिष्टुप् छंदाचें ऋग्वेदांतील प्रमाण शें. सुमारें ४१ आहे हें वर सांगितलें आहेच. याचा अर्थ असा होतो कीं, ऋग्वेदाचा $\frac{2}{5}$ भाग एकादशाक्षरी पादांनीं बनलेला आहे. दशाक्षरी पादांचें प्रमाण एकंदरींत अल्पच आहे. म्हणून वेदाचा जवळजवळ $\frac{3}{5}$ भाग अष्टाक्षरी व द्वादशाक्षरी पादांनीं झालेला आहे असें म्हणतां येईल. अष्टाक्षरी पादास **गायत्र** व द्वादशाक्षरी पादास **जागत** असें म्हणतात. याच संज्ञा आपणहि योजूं. तीन गायत्र पादांनीं ( २४ अक्षरी ) गायत्री छंद होतो. दोन गायत्र व एक जागत अशा तीन पादांनीं ( २८ अक्षरी) उष्णिक् छंद होतो. चार गायत्र पादांनीं ( ३२ अक्षरी ) अनुष्टुप् छंद होतो हें प्रसिद्धच आहे. पण ऋग्वेदांत दोन जागत व एक गायत्र अशा तीन पादांचा त्रिपाद अनुष्टुप् छंदही क्वचित् येतो. तीन गायत्र आणि एक जागत अशा चार पादांनी बृहती छंद होतो. यांतील जागत पाद तृतीयस्थानीं असला तर त्या बृहतीला **पथ्याबृहती** असें म्हणतात. पंक्ति छंद दहा अक्षरी चार पादांनीं होतो तसाच तो दोन जागत व दोन गायत्र पाद मिळूनहि होतो; इतकेंच नव्हे तर पांच गायत्र पादांनीहि पंक्ति छंद होतो. सहा गायत्र पादांनीं झालेल्या छंदास महापंक्ति किंवा जगतीपंक्ति असें म्हणतात. जगती छंद सामान्यतः बारा अक्षरी चार पादांनीं होतो हें

वर सांगितलें आहेच. तेरा अक्षरी चार पादांचा अतिजगती छंद ऋग्वेदांत मं० ८-९७–१३ ह्या एकाच ऋचेंत आढळतो. बाकी सर्व अतिजगती व त्याहून मोठ्या छंदाच्या ऋचा अष्टाक्षरी व द्वादशाक्षरी पादांच्या संयोगानेच बनलेल्या आहेत. पुढे यांचें स्वरूप प्रत्यक्ष उदाहरणें घेऊन पाहावयाचें आहेच.

वेदांतील ऋचा छंदोमय असल्यामुळे त्या विशिष्ट चालींवर म्हटल्या-गाइल्या जात असल्याच पाहिजेत. त्या तशा म्हणतां येण्यास त्यांतील पादांमध्यें अनुरूपता असावयास हवी, निदान पादाक्षरसंख्या तरी समान असावयास हवी, हेंहि ओघाने आलेंच. परिणतावस्थेस पोंचलेल्या पद्यांत ही अनुरूपता पूर्णांशाने असते तितकी ती प्राथमिक अवस्थेंतील वैदिक छंदांत नसली तरी, छंदाची विशिष्ट चाल जमवून घेतां येईल इतकी तरी ती असलीच पाहिजे. पोवाडे, लावण्या, लोकगीतें इत्यादि ग्रामीण काव्यांत प्रसंगीं अशी थोडीशी ओढाताण करून चाल जमवून घेतली जाते हें आपण पाहतोंच. प्राचीन काळीं वैदिक ऋचांचें गायन होत असेल तेव्हांहि असाच प्रकार केला जात असेल असें म्हणण्यास चिंता नाहीं. ह्या अनुमानास पोषक असें प्रमाण पिंगलाच्या छंदःशास्त्रांतहि सांपडतें. त्यांत **इयादिपूरणः ( ३-२ )** असें सूत्र आहे. या सूत्रांत पिंगलाने असें सांगितलें आहे कीं, ऋचेची चाल जमण्यास तिच्या पादांत एकाद दुसरें अक्षर न्यून पडत असेल तर त्या पादांत यण्संयोग, सवर्णदीर्घ, गुण, वृद्धि इत्यादि जे प्रकार असतील त्यांत विसंधि करून अवश्य तितकीं अक्षरें पुरीं करून घ्यावीं. उदा. पादांत एक अक्षर कमी पडत असेल व त्या पादांत **उपेंद्र** हा शब्द आला असेल तर उपेंद्र याचे जागीं **उप इन्द्र** अशीं चार अक्षरें म्हणावीं आणि ती एका अक्षराची न्यूनता पुरी करावी. **वज्रिन्** असा शब्द आला असेल तर त्याचे जागीं **वजरिन्** असें म्हणावें म्हणजे एक अक्षर वाढेल. **ब्रम्हैतु** असा संधि आला असेल तर **ब्रम्हा एतु** असा विसंधि करून अक्षरपूर्ति करून घ्यावी. छंदोगानाचे वेळीं व्याकरणशुद्ध शब्दरूपापेक्षांहि विशिष्ट चाल जमण्याचें महत्त्व अधिक आहे, असाच पिंगलाचा अभिप्राय दिसतो व त्यासाठींच त्यानें **इयादिपूरणः** या सूत्रानें पादपूर्तीचा मार्ग दाखवून दिला आहे. अपि **माषं मषं कुर्यात् छंदोभंगं न कारयेत्** हेंच तत्त्व पिंगलास अभिप्रेत आहे हें येथें उघड दिसतें. अर्थात् या तत्त्वाचा अवलंब सुस्वर छंदोगानाचे वेळीं करावयाचा आहे, सस्वर वेदपठनाचे वेळीं नाहीं.

सांप्रत वेदसंहिता पदांचे संधि केलेली अशी व सस्वर म्हटली जाते. ह्याप्रकारें म्हणण्यांत छंदांचें सुस्वरत्व लुप्त होतें. तें सुस्वरत्व प्रतीत होईल अशा चाली म्हणजेच छंदोलक्षणें होत. या चाली जमण्यासाठींच पिंगलानें स्वरांकडे दुर्लक्ष केलें असून अवश्य तेथें **इयादिपूरण** करण्याचा मार्ग सांगितला आहे. अशा प्रकारें अक्षरपूर्ति केल्यानें छंदाची चाल जमून ऋचा सुस्वर कशी होते हें कांही उदाहरणें घेऊन प्रत्यक्षच पाहूं.

(१) प्रथम गायत्रीचेंच उदाहरण घेऊं. **तत्सवितुर्वरेण्यम्** हा गायत्री मंत्राचा पहिला पाद सप्ताक्षरी आहे, अष्टाक्षरी नाहीं. त्यामुळें चाल जमत नाही. पण येथें इयादिपूरणः या सूत्रानुसार **वरेण्यम्** याचे जागीं **वरेणियम्** असें करून चाल जमवून घेतां येईल. पहाः—

तत्सवितुर्वरेणियम् । भर्गो देवस्य धीमहि । तन्नो धियः प्रचोदयात् ।

ऽ ऽ।ऽ।ऽ ऽ ऽ।ऽ।ऽ ऽ ऽ।ऽ।ऽ

यांत तिन्ही पादांत आठ आठच अक्षरें होतात हें साम्य आहेच. शिवाय आठांपैकीं सहा स्थानच्या अक्षरांचा लघुगुरुक्रम जमतो. विशेषतः तिन्ही पादांच्या उत्तरार्धाची म्हणजे शेवटल्या चार अक्षरांची लगावली । ऽ । ऽ या एकाच स्वरूपाची झाल्याने यांत सुश्राव्यता येते हें ध्यानीं घेतलें पाहिजे. पद्यरचना करितांना लगावली जमविण्याचा प्रयत्न न करितांहि ती साहजिकपणेंच कशी जमत असते हें येथें दिसून येतें. ऋग्वेदांतील कोणतीही ऋचा घेतली तरी तिच्या पादांतील अंतींच्या कांहीं अक्षरांची लगावली जमलेली असल्याचें प्रायः आढळून येईल.

आर्या छंदांत वास्तविक लगावली जमण्याचें बंधन नाही. तथापि मोरोपंती आर्यांत शेवटल्या सात आठ अक्षरांची तरी लगावली समान असलेली बहुधा आढळते. यमक एक दोन अक्षरांचें असलें तरी त्याचे मागील कांही अक्षरांचा लघुगुरुक्रम समान असल्याचें दिसून येतें. लगावली समान असणें ही पहिली पायरी होय, तीन अक्षरेंहि समान जमून यमक साधणें ही त्यापुढील दुसरी पायरी आहे. पुढील मोरोपंती आर्या पहाः—

एह्येहि देव देव श्रीकृष्ण नमोस्तुते असें बोले ॥
ऽ ऽ । । ऽ । ऽ । ऽ ऽ ऽ
बोले गल्ल प्राञ्च प्रेमाश्रुभरें करूनियां डोले ॥
ऽ ऽ । । ऽ । ऽ । ऽ ऽ ऽ
सेवुनि संतत पाला संत तपाला यदर्थ करितात ॥
ऽ । । ऽ । । ऽ ऽ ऽ । । ऽ ऽ । ऽ । । । ऽ ऽ
तो प्रिय या स्तवना कीं यास्तव नाकीं हि तेंचि वरितात ॥
ऽ । । ऽ । । ऽ ऽ ऽ । । ऽ ऽ । ऽ । । । ऽ ऽ

यांतील पहिल्या आर्येंत द्वितीय व चतुर्थ पाद समान लगावलीचे आहेत तर दुसरीचीं दोन्ही अर्धें तशीं आहेत. बंधन नसतांहि स्वाभाविकपणेंच छंदाच्या पादांत कांही अक्षरांची तरी लगावली जमून येतेच. आणि ती पादांतील अंत्याक्षरापासून मागें जमत येते ही गोष्ट विशेषेंकरून लक्षांत घेणें अवश्य वाटतें. जर लगावली जमण्याचा स्वाभाविक क्रम अंत्याक्षराकडून मागे—उजवीकडून डावीकडे—असा आहे तर वृत्तलक्षण सांगतांना गण पाडावयाचे तेहि ह्या स्वाभाविक क्रमास अनुसरून अंत्याक्षरापासून प्रारंभ करून मागे पाडीत जाणें उचित होईल कीं काय हेंहि विचारार्ह वाटतें.

(२) मं. १-१२९-३ पूर्वार्धः—

दस्मो हि ष्मा वृषणं पिन्वसि त्वचम् । कं चिद् यावीररुं शूर मर्त्यम् ।

येथें प्रथम पादांत बारा अक्षरें आहेत पण द्वितीय पादांत अकराच आहेत.

पण इयादिपूरणः या सूत्रानुसार मर्त्यम् याचे जागीं मर्तियम् असें म्हटलें तर दोन्ही पादांत समान अक्षरें होतील इतकेंच नव्हे तर ते दोन्ही पाद एकाच लगावलीचे होऊन अधिक सुस्वरही होतील. पहाः—

दस्मो हि ष्मा वृषणं पिन्वसि त्वचम् । कं चिद् यावीररुं शूर मर्तियम् ।
ऽ ऽ ऽ ऽ । । ऽ ऽ । ऽ । ऽ ऽ ऽ ऽ ऽ । । ऽ ऽ । ऽ । ऽ

(३) मं. १-९५-८ पूर्वार्धः—

त्वेषं रूपं कृणुतउत्तरं यत् । संपृञ्चानः सदने गोभिरद्भिः ।

यांतील द्वितीय पाद वातोर्मि वृत्ताचा आहे. पहिला पाद वातोर्मीचा होण्यास त्यांतील सातवें अक्षर 'त' लघु आहे तेथे गुरु हवें. पण ही उणीव केवळ सं[illegible]ळे उत्पन्न झाली आहे.

**कृणुतउत्तरं** या संधीऐवजी पदें तोडून **कृणुते उत्तरं** असें म्हटल्याने ही उणीव सहज दूर होणारी आहे. प्राचीनकाळीं सुस्वर छंदोगान करितांना ( पिंगलोक्त मार्गानुसार ) असेंच पदें तोडून म्हणत असतील असें अनुमान होतें.

(४) मं. ६–१८–१०

अग्निर्न शुष्कं वनामिन्द्र हेती । रक्षो नि धक्ष्यशनिर्न भीमा ।

येथे प्रथम पाद अकरा अक्षरी इन्द्रवज्रेचा आहे. द्वितीय पादांत दहाच अक्षरें आहेत यामुळे चाल बिघडते. पण हा पाद विसंधि करून म्हटल्याने तोहि इन्द्रवज्रेचा होऊन चाल जमते. पहाः—

अग्निर्न शुष्कं वनामिन्द्र हेती । रक्षो नि धक्षी अशनिर्न भीमा ।

यावरून असेंच म्हणण्याची प्राचीन चाल असावी असें अनुमान निघतें.

(५) मं. ९–८२–१

असावि सोमो अरुषो वृषा हरी । राजेव दस्मो आभि गा अचिक्रदत् ।
पुनानो वारं पर्येत्यव्ययं । श्येनो न योनिं घृतवन्तमासदम् ।

येथे पाद **१, २** व ४ हे जगतीचे आहेत. तृतीय पादांत मात्र दहाच अक्षरें आहेत. पण इयादिपूरणाने हा पाद **पुनानो वारं परि एति अव्ययम्** असा म्हणतां येईल व मग हा संपूर्ण जगती छंद होईल. यांतील प्रथम पाद वंशस्थावृत्ताचा असून द्वितीय व चतुर्थ पाद इंद्रवंशेचे आहेत. तृतीय पादांतील तिसरें अक्षर लघु उच्चारल्यास तो पादहि वंशस्थेचा होऊन ही ऋचा म्हणजे वंशस्था–इंद्रवंशा अर्धसमवृत्त होईल. ऋग्वेदांतील बऱ्याच ऋचांत वंशस्था–इंद्रवंशा–मिश्रण आढळतें. वेदोत्तर लौकिक वाङ्मयांतहि तें बरेंच येतें.

(६) मं. ३–१–९

पितुश्चिदूधर्जनुषा विवेद । वि अस्य धारा असृजद् वि धेनाः ।
गुहा चरन्तं सखिभिः शिवेभिः । दिवो यह्वीभिर्न गुहा बभूव ।

या ऋचेंतील पहिले तीन पाद उपेंद्रवज्रेचे आहेत. चौथ्या पादांतील तिसरें अक्षर **य** हें पुढील **ह्वी** मुळे गुरु होतें, तेणेंकरून उपेंद्रवज्रा होण्यास बाध येतो. पण येथें **ह्वी**च्या योगाने मागील ऱ्हस्वास गुरुत्व येत नाही असें मानिल्यास ही संपूर्ण ऋचा उपेंद्रवज्रेची होते. मागील ऱ्हस्वास गुरुत्व देण्यास हकारयुक्त व रकारयुक्त संयोग हे विकल्पें अपवादक आहेत असें पिंगलाने सांगितलें नसलें तरी हेमचंद्राने आपल्या छंदोनुशासनांत सांगितलें आहेच. या अपवादांचीं उदाहरणें संस्कृत लौकिक वाङ्मयांत क्वचित् आढळतात. श्रीमद्-भागवतांतील पुढील वसंततिलकेचा पाद पहाः—

नारायणेति म्रियमाण इवाय मुक्तिम् ( भाग. ६–३–२४ ).

यांत **म्रि** या संयोगाने तत्पूर्वीच्या **ति** या अक्षरास गुरुत्व आलें नाहीं. **कुमारसंभवां**-तील 'गृहीतप्रत्युद्गमनीयवस्त्रा' आणि माघ काव्यांतील 'प्रासनाभिहृदमज्जनमाशु' हीं उदाहरणें प्रसिद्धच आहेत. हकारयुक्त व रकारयुक्त संयोगाने तत्पूर्वीच्या ऱ्हस्वास गुरुत्व न देण्याची ही जी प्रवृत्ति लौकिक वाङ्मयांत क्वचित् आढळते तिचें मूळ उपर्युक्त वैदिक ऋचेंत सांपडतें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

(७) मं. १०–११०–४:—

अजीजनो अमृतमर्तियेषु आ ।
ऋतस्य धर्मन्नमृतस्य चारुणः ।

यांतील द्वितीय पाद वंशस्थेचा आहे. प्रथम पादांतील पांचवें अक्षर अ हें लघु आहे तें गुरु असतें तर हा पादहि वंशस्थेचा झाला असता. या अ पुढें मृ हें ऋकारयुक्त अक्षर आलें आहे. त्याच्या योगाने मागील अ गुरु होतो असें मानून येथे वंशस्थावृत्त जमवून घेतां येईल. पुढील ऋकारयुक्त अक्षरामुळे मागील ऱ्हस्वास गुरुत्व आल्यांचीं उदाहरणें संस्कृत लौकिक वाङ्मयांतहि कांहीं आढळतात. श्रीमद्भागवतांतील पुढील वसंततिलकेचे पाद पहाः—

दोर्भिर्हृदिकृतमलंपरिरभ्य सर्वाः। ( भाग. १०–८२–३९ ).
सूतिगृहे ननु जगाद भवानजो नौ। ( भाग. १०–८५–२० ).

असाच एक इंद्रवंशेचा पाद पहाः—

देहभृतां देहकृदस्मृतिच्छिदम्। ( भाग. १०–८३–२० ).

या उदाहरणांत अनुक्रमें कृ, गृ व भृ यांच्या योगाने तत्पूर्वीच्या ऱ्हस्वास गुरुत्व आलें आहे. ऋकारयुक्त अक्षरें हीं जणूं काय जोडाक्षरेंच आहेत असें मानून मागील ऱ्हस्वास गुरुत्व देण्याची ही जी प्रवृत्ति लौकिकवाङ्मयांत क्वचित् आढळते तिचा उगम वरीलसारख्या वैदिक ऋचांत सांपडतो असें म्हणावयास चिंता नाही.

ऋचेंतील पादाक्षरसंख्या समान करून ती छंदोगानास अधिक अनुकूल करण्यासाठी 'इयादिपूरण' इत्यादि उपाय प्राचीनकाळीं कसे योजले जात असतील याचें दिग्दर्शन येथवर झालें. यामध्ये ऋग्वेदांतील ८, ११ व १२ अक्षरी पादांच्या अनुक्रमें गायत्री, त्रिष्टुप् व जगती या छंदांचीं कांहीं उदाहरणें घेऊन गेलीं आहेत. अष्टाक्षरी चतुष्पाद अनुष्टुप् छंद सर्वांस सुपरिचित आहेच. या छंदांची–विशेषतः त्रिष्टुप् व जगती यांची परिणति होऊन त्यांपासून लौकिकवृत्तें कशीं निर्माण झालीं असतील तसेंच अष्टाक्षरी व द्वादशाक्षरी पादांच्या मिश्रणाने होणारे उष्णिक्, बृहती व पंक्ति या छंदांपासून लौकिक पद्यवाङ्मयांतील 'जाति' हा प्रकार कसा निर्माण झाला असेल याचें दिग्दर्शन जरा विस्ताराने करावें लागेल, तें लेखाच्या उत्तरार्धांत करूं. प्रस्तुत जगतीहून मोठ्या वैदिक छंदांचें सामान्यस्वरूप कसें आहे तेवढेंच कांहीं उदाहरणें घेऊन या पूर्वार्धांत पाहूं.

### अत्यष्टि छंद

मं. १-१२७-९.

तमस्य पृक्षं उपरासु धीमहि
नक्तं यः सुदर्शतरो दिवातरात्
अप्रायुषे दिवातरात्॥
आदस्यायुर्ग्रभणवद्
वीलु शर्म न सूनवे
भक्तमभक्तमवो व्यंतो अजराः
अग्नयो व्यंतो अजराः॥

सामान्य स्वरूप—१ पूर्वार्धांत प्रथम दोन द्वादशाक्षरी पाद असून त्यांपुढे एक अष्टाक्षरी पाद आहे म्हणजे पूर्वार्ध हें त्रिपाद् अनुष्टुप् आहे. २ या पूर्वार्धांतील दुसऱ्या व तिसऱ्या पादाच्या अंतीं शब्दावृत्ति साधलेली आहे. ३ उत्तरार्धांत प्रथम दोन अष्टाक्षरी पाद, त्यांपुढे एक द्वादशाक्षरी पाद व पुढे पुन्हां एक अष्टाक्षरी पाद असे एकूण चार पाद आहेत, म्हणजे उत्तरार्ध ही पथ्याबृहती आहे. ४ आणि तींत तिसऱ्या व चौथ्या पादांच्या अंतीं पूर्वार्धा-

प्रमाणेंच शब्दावृत्ति साधिलेली आहे. याप्रमाणें त्रिपाद अनुष्टुप् आणि पथ्याबृहती यांच्या संयोगानें हा अत्यष्टि छंद झाला आहे. अत्यष्टीचें सामान्य स्वरूप सर्वत्र असेंच असतें कीं काय हें पाहाण्यासाठी आणखी कांही उदाहरणें घेऊं.

मं. १–१३०–९.

अत्यष्टि

सूरश्चक्रं प्रवृहज्जात ओजसा
प्रपित्वे वाचमरुणो मुषायति
ईशान आ मुषायति ॥
उशना यत् परावतो
अजगन्नूतये कवे
सुम्नानि विश्वा मनुषेव तुर्वणिः
अहा विश्वेव तुर्वणिः ॥

मं. १–१३०–७

अत्यष्टि

भिनत् पुरो नवतिमिन्द्र पूरवे
दिवोदासाय महि दाशुषे नृतो
वज्रेण दाशुषे नृतो ॥
अतिथिग्वाय शंबरम्
गिरेरुग्रो अवाभरत्
महो धनानि दयमान ओजसा
विश्वा धनानि ओजसा ॥

या दोन्ही अत्यष्टींमध्येही पूर्वार्ध हें दोन **जागत** व एक **गायत्र** अशा तीन पादांमिळून झालेलें **त्रिपाद अनुष्टुप्** असून उत्तरार्ध हें तीन **गायत्र** व एक **जागत** अशा चार पादांनीं झालेली **पथ्याबृहती** आहे. म्हणजे मागलीप्रमाणेंच या दोन्ही अत्यष्टीदेखील "त्रिपाद अनुष्टुप् +पथ्याबृहती=अत्यष्टि" या समीकरणांत बसणाऱ्याच आहेत.

मं० १–१२८–३

अत्यष्टि

एवेन सद्यः परिएति पार्थिवम्
मुहुर्गी रेतो वृषभः कनिक्रदत्
दधद्रेतः कनिक्रदत् ॥
शतं चक्षाणो अक्षभिः
देवो वनेषु तुर्वणिः
सदो दधान उपरेषु सानुषु
अग्निः परेषु सानुषु ॥

या अत्यष्टीच्या प्रथम पादांत अकरा अक्षरें होतीं. त्यांतील **पर्येति** याचे जागीं इया-दिपूरणानें **परिएति** असें करून बारा अक्षरें करून घेतलीं आहेत. असें पादपूरण न केलें तर एक अक्षर न्यून पडून म्हणजे एकूण ६८ ऐवजीं ६७ अक्षरें होऊन ही **निचृदत्यष्टि** होईल. तिज-

पेक्षा पादपूरण करून घेतलेली ही अत्यष्टि छंदोगानास अधिक अनुकूल होईल हें उघड आहे. इतर सर्व प्रकारें अत्यष्टीचें सामान्य स्वरूप हींतहि आहेच.

मं० १–१३०–२

विराट् अत्यष्टि

पिबा सोममिन्द्र सुवानमाद्रिभिः
कोशेन सिक्तमवतं न वंसगः
तातृषाणो न वंसग :॥
मदाय हर्यताय ते
तुविष्टमाय धायसे
आ त्वा यच्छंतु हरितो न सूर्यम्
अहा विश्वेव सूर्यम् ॥

येथे शेवटल्या दोन ओळींत एकेक अक्षर कमी पडून एकूण दोन अक्षरांची न्यूनता आल्याने ही **विराडत्यष्टि** झाली आहे. तथापि या दोन्ही ओळींत अंतीं **सूर्यम्** याचे जागीं **सुरियम्** असें म्हणून छंदोगानाचे वेळीं चाल जमवून घेतां येण्याजोगी आहे. अत्यष्टीचें अवांतर सर्व लक्षण हिला लागू पडत आहेच.

ऋग्वेदांत ज्या पाऊणशेंच्या वर अत्यष्टि आहेत त्यांत निचृत्, भुरिक् असे कांहीं पोटप्रकार असले तरी त्या सर्व अत्यष्टींचें सामान्य स्वरूप एकच आहे आणि छंदोगानाची चालहि सारखीच जमणारी आहे हें वरील उदाहरणांवरून दिसून येईल. अत्यष्टीचे प्रत्येक अर्धातील शेवटला पाद तत्पूर्वीच्या पादाहून तोकडा असतो व या दोन्ही पादांचे अंतीं शब्दावृत्ति साधलेली असते हें आपण पाहिलेंच आहे. या स्वरूपावरून असें अनुमान होतें कीं, मुख्य गायकाने वरील पाद म्हणावे आणि त्याच्या साथीदारांनी हे शेवटले तोकडे पाद म्हणून त्यास साथ द्यावी, अशी छंदोगानाची प्राचीन पद्धति असावी. आजहि लावण्या व पोवाडे म्हणतांना मुख्य गायकाने कांही पाद म्हणावे व त्यांतील शेवटल्या पादांचें अनुकरण करून साथीदारांनी त्यास साथ द्यावी किंवा त्याची री ओढावी हा प्रकार आपण पाहतोंच. तसाच प्रकार वैदिक छंदोगानाचे वेळींहि प्राचीन काळीं रूढ असावा असें अनुमान वरील अत्यष्टींचें स्वरूप पाहून होतें.

आतां अत्यष्टीहून लहान म्हणजे अष्टि, अतिशक्वरी इ. छंदांचीं कांहीं उदाहरणें पाहूं.

मं. १ – १२७ – २ अष्टि छंद

यजिष्ठं त्वा यजमाना हुवेम
ज्येष्ठमंगिरसां विप्र मन्मभिः
विप्रेभिः शुक्र मन्मभिः ॥
परिज्मानमिव द्याम्
होतारं चर्षणीनाम्
शोचिष्केशं वृषणं यमिमा विशः
प्रावन्तु जूतये विशः ॥

मं. १ – १२७ – ६ अष्टि छंद

त्वमग्ने सहसा सहन्तमः
शुष्मिन्तमो जायसे देवतायते
रयिर्न देवतातये ॥
शुष्मिन्तमोहि ते मदो
द्युम्निन्तम उत क्रतुः
अध स्मा ते परि चरन्त्यजर
श्रुष्टीवानो नाजर ॥

अत्यष्टीहून एकंदरींत चार अक्षरें कमी होऊन ऋचेंतील अक्षरसंख्या ६८ ऐवजी ६४ झाली आहे म्हणून हा छंद अष्टि आहे इतकेंच. बाकी याचें सामान्य स्वरूप अत्यष्टी-सारखेंच आहे. पहाः—१ पूर्वार्धांत तीन पाद आहेत. २ त्यांतील पहिले दोन लांब व तिसरा तोकडा आहे. आणि ३ दुसऱ्या व तिसऱ्या पादांचे अंतीं शब्दावृत्ति आहे. ४ उत्तरार्धांत चार पाद आहेत ५ त्यांतील तिसरा लांब व बाकीचे तोकडे आहेत आणि ६ तिसऱ्या व चौथ्या पादांचे अंतीं शब्दावृत्ति आहे. असेंच सामान्य स्वरूप अत्यष्टींचें असतें.

मं. १ – १२९ – ९ अतिशक्करी

त्वं न इन्द्र राया परीणसा
याहि पथाँ अनेहसा
पुरो याहि अरक्षसा ॥
सचस्व नः पराक आ
सचस्व अस्तमीक आ
पाहि नो दूरादारादभिष्टिभिः
सदा पाह्यभिष्टिभिः ॥

रचनेच्या दृष्टीनें या अतिशक्करीचें अष्टि –अत्यष्टींशीं साम्य आहे. पादसंख्या त्यांच्या प्रमाणेंच ३ + ४ = ७ आहे. अक्षरावृत्तिहि तशीच आहे. एकूण अक्षरसंख्या ६० भरते म्हणूनच हिला अतिशक्वरी म्हणावयाचें.

अतिशक्करीहून लहान म्हणजे ५६ अक्षरी छंद शक्करी होय. हा छंद प्रायः अष्टाक्षरी सात पादांनी होतो. अष्टाक्षरी सहा पादांच्या छंदास महापांक्ति म्हणतात आणि अष्टाक्षरी पांच पादांच्या छंदास पंक्ति असें म्हणतात. कांहीं सूक्तांत शक्करी व महापांक्ति एकीपुढें एक आलेल्या असून त्यांत शेवटल्या दोन ओळींचें पालुपद आहे. मं. १० सूक्त १३३ मध्ये तीन शक्करी व त्यांपुढील तीन महापंक्ति या सहांमध्यें समान पालुपद आहे. उदाहरणार्थ यांतील एकेक छंद घेऊं.

मं. १० – १३३ – १ विराट् शक्करी

प्रो षु अस्मै पुरोरथम्
इन्द्राय शूष मर्चत
अभीके चिदु लोककृत्
संगे समत्सु वृत्रहा
अस्माकं बोधि चोदिता
नभन्तामन्यकेषां । ज्याका अधि धन्वसु ॥

मं. १० – १३३ – ४ विराड् महापंक्ति.

योो न इन्द्राभितो जनो
वृकायुरादिदेशति
अधस्पदं तमीँ कृधि
विबाधो असि सासहिः
नभन्तामन्यकेषां । ज्याका अधि धन्वसु ॥

या छंदांची रचना आणि त्यांच्या अंतीं असलेलीं समान पालुपदें यांवरून असें अनुमान होतें कीं, प्राचीनकाळीं सामुदायिक रीतीने अशा सूक्तांचें छंदोगान होत असेल तेव्हां मुख्य गायकाने यांतील वरले पाद म्हणावे आणि इतरांनी त्यांपुढील पालुपदासारख्या असलेल्या ओळी म्हणाव्या अशीच पद्धति रूढ असावी. विस्तारभयास्तव आणखी उदाहरणें घेतां येत नाहीत.

वरील विवेचनावरून निवर्णोर निर्गत असेः—

१ छंदोगानास अक्षरांवरील स्वर प्रतिकूल असल्याने छंदोगान हें सस्वर होत नसावें.

२ विसंधीने अक्षरपूर्ति करून ऋचेचे पाद छंदोगानास अधिक अनुकूल करून घेतले जात असावे.

३ ऋग्वेदांत मुख्यत्वें २४ ते ४८ अक्षरीच छंद आहेत.

४ सारा ऋग्वेद प्रायः ८, १०, ११ व १२ अक्षरी पादांनीच बनलेला आहे.

५ ऋग्वेदांत समानाक्षर-चतुष्पाद छंद प्रायः तीनच आहेत.—१ अनुष्टुप्, २ त्रिष्टुप् आणि ३ जगती.

६ अत्यष्टीसारखे मोठे छंदहि प्रायः ८ व १२ अक्षरी पादांनीच झालेले आहेत.

७ छंदाच्या पादांतील शेवटल्या कांही अक्षरांची लगावली साहजिकपणेंच जमलेली आढळते.

८ छंदोगानासाठी मुख्य गायक व त्याचे साथीदार असा संच प्राचीनकाळीं असावा. ऋचेचा कांही भाग मुख्य गायकाने म्हणावा आणि त्यापुढील पालुपदासारखा भाग साथीदारांनी म्हणून त्यास साथ द्यावी अशी प्राचीन छंदोगानपद्धति असावी.

---

## साभार स्वीकार—

**नवो देशी हिसाव—**

(प्रकाशक— पां. श्री. टिल्लू, ३८ झावबाची वाडी, मुंबई२. किं. चार आणे) ही गुजराथी अंकलिपी (मुळाक्षर-बोध-युक्त) आहे. मराठी अंकलिपीपेक्षां हिच्यांत जास्त काय आहे, ह्या दृष्टीनें पाहूं जाणारास असें आढळेल कीं १० ते १, २० ते ११, ३० ते २१ असे उलट पद्धतीनें देखील अंक देण्यांत आले आहेत. मुळाक्षरांसाठीं दिलेले सचित्र शब्द अर्थातच गुजराथी आहेत. उदा०— ई साठीं खाटल्याचें चित्र आहे; कारण खाटलें ह्याला गुजराथी शब्द 'ईस' आहे.

* * *

# उच्चांक विकल्प मतपद्धती :

ले०—शरच्चंद्र वामन रानडे, नागपूर

**A. B. C. ( Alternative Best Choice ) Voting System**

निवडणुकी संबंधांत सध्या संक्रामी एकमत ( सिंगल ट्रॅन्स्फरेबल व्होट ) पद्धती ही सर्वांत उत्तम समजली जाते. अल्पमतासही प्रमाणशीर प्रतिनिधित्व आणि वैयक्तिक मत-स्वातंत्र्य हे त्या पद्धतीमधील विशेष होत. पण प्रमाणशीरपणा साधण्यासाठीं ' एकच मत, ' अत्यल्प उच्च पसंती पडलेल्या उमेदवाराचें नांव अजिबात गाळणें, ' खालच्या पसंतींच्या हिशेबांत व्यक्तिनिरपेक्ष अनिश्चित किंमती, ' वगैरे तंत्रांमुळें पक्षानुसार हिशेबी प्रमाणशीरत्व साधत असलें तरी वैयक्तिक तुलना बरोबर होत नाहीं असें दिसून येतें. त्यामुळे विद्यापीठें किंवा म. सा. परिषद अशांसारख्या संस्थांच्या पक्षनिरपेक्ष निवडणुकींना या पद्धतीचे हिशेब अयोग्य ठरतात. तरी तीमधील गुण कायम ठेवण्यासाठीं क्रमसार मतदानासारख्या बाबी कायम ठेवून, अनिष्ट हिशेबाचें तंत्र सुधारल्यास ती पद्धत सर्वांसच अधिक समाधानकारक व उपयुक्त होणार आहे. " उच्चांक विकल्प मतपद्धती "मध्ये हेंच साधलें आहे.

१ मतदान संक्रामी एकमत पद्धतीप्रमाणेच क्रमसार करावयाचें व प्रतिनिधी किती किमान मतांस मिळावयाचा हा कूटांक ( कोटा ) त्या पद्धतींनेंच ठरवावयाचा. निदान कूटांकाइतकीं पाहिलीं मतें मिळालेले उमेदवार निवडून आले म्हणून जाहीर करण्यापर्यंत या दोन पद्धतींत फरक नाहीं.

२ पुढें मात्र कूटांकावर मिळालेलीं मतें मतांशांचें प्रमाण काढून त्याप्रमाणे वाटणें हें, पक्ष-निरपेक्षतेंत निरर्थक व पक्षसापेक्षतेंतही या पद्धतींत अनवश्यक म्हणून गाळावयाचें. प्रतिनिधि मिळालेल्या या मतपत्रिका बाजूस ठेवावयाच्या आणि संक्रामी एकमतपद्धतीप्रमाणें पुढील वाटणी चालू करावयाची. प्रथम अगदी कमी मतें मिळालेली गड्डी व त्यावरील तदनंतर, या प्रमाणेच वाटावयाच्या; आणि या वाटणीने कोणी प्रतिनिधी कूटांकाइतकीं मतें होऊन निवडून येतात का हें पहावयाचें. पहिल्या मतानें निवडून आलेलीं नांवें गाळावयाचीं, पण दुसऱ्या पसंतींत गड्डी वाटली गेली त्या उमेदवाराचें नांव मात्र गाळावयाचें नाहीं. त्यास अन्य कोणाचीं दुसरीं मतें मिळाल्यास हिशोबांत घ्यावयाचीं. निवडून येईल त्यास पाठिंबा देणाऱ्या पहिल्या व दुसऱ्या मतांच्या मतपत्रिका वरील प्रमाणेंच बाजूस ठेवावयाच्या. त्यांतील पहिल्या मताच्या पत्रिका वाटावयाच्या नाहींत, व दुसऱ्या मताच्या मतपत्रिकांवर त्याचें नांव प्रथम पसंती म्हणून दर्शवावयाचें. हिशेबाचे तक्त्यांत त्या मतपत्रिका मूळ प्रथम पसंतीनुसार गेलेल्या कमी झाल्या म्हणून दर्शवावयाचे, दुसऱ्या पसंतीनुसार निवडून आलेल्यास दुसऱ्या पसंतीच्या अखेरपर्यंत मिळतील तेवढीं मतें त्याचे हिशेबीं घ्यावयाची.

३ याच पद्धतीने तिसऱ्या, चौथ्या वगैरे पसंतींची वाटणी क्रमाने करावयाची.

४ वाटावयाच्या मतपत्रिका कूटांकाहून कमी शिल्लक राहिल्या म्हणजे या अत्यल्प मतदारांच्या संख्येस प्रतिनिधित्व असूं शकत नाही म्हणून ही वाटणी बंद करावयाची आणि सर्व मतपत्रिका पुन्हा वाटणीस घ्यावयाच्या.

ही वाटणी म्हणजे वरील अत्यल्प मतदारांस पहिलाच प्रतिनिधी मिळण्यासाठीं असली तरी सर्वसाधारण मतदारांना दुसरा प्रतिनिधि देणारी आहे. संक्रामी एकमत-पद्धती-प्रमाणे या पद्धतींत मतदारांस फक्त एकच मत नाही. संधी मिळाल्यास त्याला दुसरें तिसरें

याप्रमाणे जितक्या जागा तितकीं मतें उपयोगांत आणतां येतील. फक्त आपणांस प्रतिनिधि मिळाल्यावर आपल्याप्रमाणेच पाहिला दुसरा वगैरे प्रतिनिधी इतरांसही मिळण्याची संधी त्याने दिली पाहिजे व तशी वांटणी होईपर्यंत बाजूस राहिलें पाहिजे.

५ सभेंत प्रत्यक्ष मतदारांची वांटणी पुन्हा पुन्हा करावी त्याचप्रमाणे मतपत्रिकांचा हा हिशेब आहे व मतपत्रिका लेखी असल्याने मतपत्रिकांवरील खालच्या मतांबरोबरच वरच्या मतांचाहि विचार करितां येतो हा सभेंत प्रत्यक्षांत न मिळणारा एक फायदा येथें आहे.

६ प्रमाणशीरतेच्या दृष्टीने मतदाराचा दुसरा प्रतिनिधि म्हणून निवडून येणाऱ्या प्रतिनिधीस एकंदरीने दुप्पट मताचा पाठिंबा असला पाहिजे हें ओघानेच आलें. म्हणून ही किमान संख्या दाखविणारा कूटांक मूळ मतसंख्येची दुप्पट करून काढावयाचा; म्हणजे हा पहिल्या कूटांकाच्या दुप्पट (किंवा एका आंकड्याने कमी होतो.) तिसरा वगैरे पुढील प्रतिनिधि काढतांना हा कूटांक तितक्या पटीने वाढेल.

७ ह्या दुसऱ्या तिसऱ्या प्रतिनिधींचा हिशेब पहिल्या प्रतिनिधीप्रमाणेच व्हावयाचा, व अगदी सर्व मतपत्रिकांवरील अखेर मतवांटणी संपूनही जागा शिल्लक राहिल्यास अखेर हिशेबीं दिसणाऱ्या मतांप्रमाणे वरचे प्रतिनिधि निवडून घ्यावयाचे.

८ वरील हिशेब क्रमाने चालू असतां प्रतिनिधींची आवश्यक संख्या भरतांच हिशेब पुरा होईल.

९ सर्वांत जास्त मतांचा पाठिंबा असलेला प्रतिनिधि यशस्वितेच्या क्रमांत नेहमी पहिला समजावयाचा.

उदाहरण—११६ मतदारांस ७ उमेदवारांमधून ३ निवडावयाचे आहेत. प्रथम प्रतिनिधीसाठीं कूटांक [ ११६ ÷ ( ३ + १ ) + १ = ] ३० होईल, व आवश्यक तर नियम ६ प्रमाणे दुसऱ्या प्रतिनिधीसाठीं [ २३२ ÷ (३ + १) + १ = ] ५९ होईल.

| प्रतिनिधी पहिला | | | | | | | | दुसरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| पसंती १ | २ | | | | | | ३ | १ |
| वाटावयाचे ११६ | ल ३ | स ४ | प ७ | ट १४ | त १५ | एकूण | ३३ | |
| क ५०* | | | | | | – | | |
| च २३ | | | | | १०* | – | | |
| ट १४ | | | ५ | | ५ | २४ | | ट ६०* |
| त १५ | | | २ | | –१० | ७ | ८ | त ३६ |
| प ७ | | | | १४ | | २१ | ३ | प ७ |
| स ४ | ३ | | | | | ७ | १० | स ५ |
| ल ३ | | ४ | | | | ७ | ५ | ल ६ |
| संपलेल्या मतपत्रिका | | | | | | | ७ | २ |
| प्रतिनिधी मिळालेल्या ५० | | | | | ३३ | | | ६० |
| शिल्लक ६६ | | | | | ३३ | | २६ | ५४ |

* निकाल—क च ट हे निवडून आले.

लघुनिबंध

लेखक
प्रा. रामचंद्र महादेव मराठे,
एम्. ए., एल्.एल्. बी.

# खराटा

सौभाग्यवतीनें जेव्हां खराटा आणण्याचा हुकूम मला फर्मावला तेव्हां मी आश्चर्यानें स्तंभितच झालों. घरांतील खराटा सुस्थितींत होता असें नव्हे, अथवा खराट्यावांचून आम्हीं भागवूं शकलों असतों असाही माझा दावा नाहीं. आणण्याचें काम मला सांगितलें जावें यांतच माझ्या विस्मयाचा उगम होता. एरवीं सुपारीपासून सुवर्णापर्यंत कोणत्याही वस्तूचा सौदा करण्याची माझी अपात्रता जाहीरपणें घोषली जात असतांना खराट्याची खरेदी करण्याच्या जबाबदारीला मी कसा लायक ठरलों तें मला उमजेना.

पण जरा डोकें खाजविल्याबरोबर लख्ख प्रकाश पडला. माझा दर्जा वाढल्यामुळें ही कामगिरी माझ्यावर सोंपविण्यांत आलेली नव्हती. स्वतः ती पार पाडण्यांत सौभाग्यवतीच्या दर्जाला धोका होता म्हणून आपद्धर्मानें मला पदरीं पाडून घेण्यांत आलें होतें ! हातभर लांब खराटा हातांत धरून आपण रस्त्यानें चालत आहोंत असें चित्र जेव्हां सौभाग्यवतीच्या मनश्चक्षूंसमोर उभें राहिलें तेव्हांच तिच्या अंगावर शहारे आले. आणि अशा तऱ्हेनें खराटा हेलकावीत आपण चालत असतां समोरून फटाकड्या नीलाताई येत आहेत असा दुसरा प्रवेश जेव्हां कल्पनेकडून चितारला गेला तेव्हां तर तिच्या अहंकाराचा चक्काचूरच झाला. त्याच क्षणीं, आकाश कोसळलें तरी स्वतःचे असे धिंडवडे करून घ्यावयाचे नाहींत अशा निश्चयानें, खरेदी–विक्रीखात्यांतील माझ्या नालायकीचे सर्व पुरावे नजरेआड करून, मलाच खराटा आणण्यासाठीं धाडण्याचा संकल्प तिनें सोडला.

स्त्रीचा संकल्पच तो ! त्याच्या आणि सिद्धीच्या आड उभें राहण्याची ईश्वरी इच्छेची सुद्धां प्राज्ञा नाहीं. मग मज पामराची काय वाट ? रहस्यमय खुनाच्या रोमहर्षण कथेंतून डोकें काढून मी खराट्याच्या दुकानांत दाखल झालों. मला पाहतांच बहुधा माझी अक्कल अजमावल्यामुळें दुकानदाराच्या वक्तृत्वाला एकदम बहर आला. " उत्तम कोंकणी खराटा–अस्सल जयतापुरी हीर–सुंभाची मजबूत मगरबंध बांधणी–बारा महिन्यांची हमी—" अशा शेलक्या शब्दांनीं शिफारसलेला खराटा त्यानें माझ्या नजरेसमोर नाचविला, आणि माझ्या मौनाचा संमतिवाचक अर्थ करून लगेच माझ्या गळ्यांत बांधला. एवंगुणविशिष्ट खराटा खरीदून आज तरी क्रयशास्त्राच्या कसोटीला मी खास उतरणार अशा विश्वासानें अस्मादिकांचें शिष्टमंडळ परत फिरलें.

केव्हां एकदां खुनी इसमाचा शोध लागेल अशा विवंचनेंत मार्गक्रमण करीत असतांना अकस्मात माझें लक्ष त्या खराट्याच्या सौंदर्यानें वेधलें. खराट्याचा तो ( राशनमधील गव्हाचा ) गोधूमवर्ण, हिरव्या तांबड्या सुंभाची सुबक मूठ, अणकुचीदार टोकें, पल्लेदार हिरांचें अभेद्य ऐक्य– सर्वांतच अलौकिक आकर्षकपणा मला भासला. चालतांना रस्त्यांत एके ठिकाणीं तो खराटा हळुवारपणें फिरवून पाहण्याचा मोह मला आवरला नाहीं. आणि त्या स्थळीं एकदम दिसून आलेली निर्मळता पाहून मी स्तंभितच झालों. किती गुणी आहे हा खराटा असा विचार एकदम मनात आला. अशिवाला दूर करुन प्रच्छन्न सौंदर्य प्रगट करण्याचें केवढें सामर्थ्य आहे याच्या अंगीं ! आणि लोक यालाच हीन समजतात, याला हातीं घेऊन जायलाही शरमतात !

वास्तविक देवत्वाच्या खालोखाल मान स्वच्छतेचा. अमंगलाला दूर करून स्वच्छतेची प्रतिष्ठापना करणाऱ्या खराट्याची आपण किती बूज करायला हवी. कितीही गलिच्छ ठिकाण असेना, हा खराटा त्यावरून सफाईनें फिरूं द्याः एकदम त्या खातेऱ्याचें मंदिर होईल. अस्वच्छतेवरील विजयाहून आणखी मोठा विजय कोणता असूं शकेल ? हा खराटाही राजकवि यशवंतांच्या विहिरीप्रमाणें म्हणूं शकेल " माग्य थोर करूं शकतों विमल मलिनतेला. " मग त्या खराट्याची अशी अवहेलना कां व्हावी ? त्याची संभावना कोपऱ्यांत करण्यांत कोणती समर्पकता आहे ? या पापाच्या प्रायश्चित्तार्थतच नववधूबरोबर केरसुणी चोरून आणण्याचा प्रघात पडला असावा.

बरें निर्जीव खराट्याची आपण उपेक्षा केली तरी एक वेळ चालेल. पण तो खराटा चालविणाऱ्या मानवाची बेअदबी आपण कां करावी ? त्याला अस्पृश्य मानून त्याची सावलीही अंगावर पडूं न देण्याची दक्षता आपल्या शहाणपणाची द्योतक खास नाहीं. वास्तविक जो दररोज स्वच्छतेचे धडे देऊन आपणाला देवत्वाकडे नेतो त्याचा आपण सन्मान करायला हवा. घाणींतून उद्‌भवणाऱ्या रोगांपासून जो आपलें रक्षण करतो, स्वतः मालिन्याचा संपर्क सहन करूनही जो समाजाला मालिन्यापासून वांचवितो त्याचा दर्जा किंवा धंदा हलका खास नाहीं. महात्मा गांधींनीं तुरुंगांत अनेक वेळा झाडूवाल्याचें काम करून या समाजोपयोगी व्यवसायाची थोरवी पटवून दिली आहे. लो. टिळकांविषयीं असें सांगतात कीं ते म्हणत " मी पत्रकार झालों नसतों तर कीर्तनकार झालों असतों. " आगरकरांसारख्या समाजसेवकांना असा प्रश्न विचारला गेला असता तर त्यांचेंही उत्तर असेंच आलें असतें कीं, " मी सुधारक झालों नसतों तर झाडूवाला झालों असतों. "

समाजाच्या मनांतील मळ काढून टाकण्याचा अटोकाट प्रयत्न आगरकरांनीं केला. पण शरीरावरील किंवा शरीरासभोंवतीच्या परिसरांतील अस्वच्छता दूर करणें तितकेंच महत्त्वाचें आहे. कारण मलिन परिस्थितींत मनाचें निर्मलत्व साधणेंच शक्य नाहीं. म्हणून शिंदीच्या पातींची केरसुणी, माडाच्या हिरांचा खराटा, गवताचा कुंचला, घोड्याच्या केसांचा ब्रश, आणि निर्वात मार्जनी ( vacuum cleaner ) इत्यादि अनेक साधनें निर्माण करून मानव अस्वच्छतेशीं झुंज खेळत आला आहे. हीं सर्व मनुष्याच्या निर्मलतेच्या पावित्र्याच्या आकांक्षांचीं प्रतीकें आहेत. तीं प्रतीकें धारण करतांना अथवा वापरतांना मानवाला केव्हांही कमीपणा वाटूं नये !

महायुद्धाच्या पडझडीनंतर एक इंग्लिश स्त्री हातांत झाडू घेऊन पुनरागमनासाठीं आपल्या घराची झाडलोट करावयास निघाली तेव्हां विचारवन्तांना स्त्रीच्या सनातनकार्याची ती साकार मूर्तीच भासली. पुरुषांची आगलावी धामधूम संपल्यानंतर पडलेली घाण निरलसपणें दूर करून मंगल सडे शिंपणारी अंगना हीच भावी शांततेचा एकमेव आधार आहे. म्हणूनच द्वेष, मत्सर, संशय, आक्रमक वृत्ति इत्यादि किल्मिषें मनाच्या कोपऱ्याकोपऱ्यांतून झाडून टाकून सदिच्छा व सहकार यांचा निर्मल सुगन्ध पसरवूं इच्छिणाऱ्या संयुक्त राष्ट्रांच्या शैक्षणिक, शास्त्रीय व सांस्कृतिक संघटनेला मी असें सुचवीन कीं श्रमजीवि लोकांच्या विळाहातोड्याप्रमाणें तुमच्या निशाणाला जर प्रतीक हवें असेल तर ' खराटा धारण करणारी स्त्री ' हेंच निवडा.

———

# भावी रामराज्यांतील रस :

लेखक :— राजकवि काळेले

रस कोणते मानावेत या संबंधी विद्वानांत एकवाक्यता नाही. रस अनंत आहेत, येथपासून तो रस एकच आहे येथपर्यंत अनेक मतें आहेत. आता तज्ज्ञांना वाटूं लागलें आहे की, रसांची नक्की संख्या निश्चित करीत बसण्यांत स्वारस्य नाही. खरोखर रसांचा विचार संख्येच्या दृष्टीने न करतां तो जीवनाच्या दृष्टीने करावयास हवा. कारण जीवन हेंच रस-संजीवन. जीवन-प्रवाहाच्या संगतीने रस राहतात-बदलतात. रस म्हणजे उत्कट आस्वाद्यमान भावना. कांही उत्कट आस्वाद्य भावांची नांवें ग्रंथांत दिलेली आढळतात. परंतु ग्रंथांत उल्लेखिलेले आठ नऊ स्थायिभाव हेच काय ते रसयोग्य भाव असा त्रिकालाबाधित नियम सांगतां येणार नाही. जीवनपरत्वें इतर भावहि उत्कट आस्वाद्य होऊं शकतात. पूर्वी कधीं इतकी उत्कट न वाटलेली खेप भावना आता रसयोग्य वाटते, असा निर्वाळा श्री. अनिलां-सारखे कवि देतात. खेपस्थायिभाव प्रक्षोभ हा एक स्वतंत्र रस मानावा हें अनिलांचें म्हणणें खरोखर विचारार्ह वाटतें. आपाततः प्रक्षोभरस वीरासारखा वाटतो. परंतु या रसांतील भेद महत्त्वाचा आहे, ही गोष्ट ध्यानांत आणावयास हवी. वीराच्या बुडाशी अपरसहिष्णुता व जिगीषा या प्रवृत्ति आहेत तर, प्रक्षोभाच्या मुळाशी अन्यायाच्या प्रतिकाराची भावना आहे. वीररसांत क्रोधाचा आवेश असतो तर प्रक्षोभांत बंडाचा उद्दामपणा असतो. वीरांत पराक्रमी तुल्यबलांचें द्वंद्व असतें. प्रक्षोभांतहि द्वंद्व असतें, पण तें फार निराळें. स्वतःच्या फायद्यासाठी दुसऱ्याचा गैरउपयोग करून घेणारा व आपल्या योग्य वाटयास वंचनेने मुक-णारा यांतील तें द्वंद्व होय. वीर हा शस्त्रयुगीन रस होय, तर प्रक्षोभ हा अर्थयुगीन रस आहे. यंत्राचा शोध लागण्यापूर्वी स्वतःच्या फायद्यासाठी दुसऱ्याचा अयोग्य उपयोग कर-ण्याचा प्रश्न निघू शकत नव्हता. यंत्राच्या शोधाने परिस्थिति बदलून जो आर्थिक प्रश्न उत्पन्न झाला त्यामध्ये केवळ वंचनेमुळे स्वतःच्या प्रामाणिक वाटयास मुकण्याचा सार्वजनीन प्रश्न आला. त्याच्या परिणामतः खेपभावनेस आता रसयोग्यता प्राप्त झाली. असो.

जीवनपरत्वें पूर्वी अनुत्कट असलेली भावना उत्कट होऊं शकते, तद्वत् उत्कट ठर-लेली भावना दुरास्वाद्य होऊं शकते. एका काळीं रसयोग्य वाटलेली भक्तिभावना आज तशी वाटत नाही. प्रा. पंगूंनी तर म्हटलें आहे की, " भक्तिभावनेचा प्रवाह आता नाम-शेष होण्याइतका आटत चालला असून आजच्या वाङ्मयांत तर तिचा लवलेश औषधाला सुद्धा सापडणे कठीण झालें आहे. " सारांश रस हे जीवनावलंबी आहेत.

आपल्या भावनांचें ( रसांचें ) जीवनाशी पूर्ण सहनियमन झालेलें असतें. आपल्या साऱ्या भावनांच्या बुडाशी एकच अहंवृत्ति आहे. या मूळ वृत्तींतून स्ववर्धन व स्वसंरक्षण या वृत्तींचा उगम होतो व त्यांपासून युद्धादि आणखी अनेक प्रवृत्ति फांदटतात. या अनेक प्रवृत्तींच्या साहचर्याने भावनांचें विशालचक्र सारखें फिरत असतें. आपल्यांतील मूळ अहं-वृत्तीला भोजाने शृंगार हें नांव दिलें आहे. शृंगारांतून सर्व भावना निपजतात आणि आपल्या किरणामुळे सूर्य चमकतो तद्वत् भावनांच्या योगाने शृंगाराचा प्रत्यय देतो, असें तो म्हणतो. अग्निपुराणांत सुद्धा शृंगाराचेच हास्यादि हे भेद होत असें सांगितलें आहे. कै.

नाटयाचार्य खाडिलकरांच्या " शृंगारराजा नवदल त्याला। " या पद्योक्तींत तोच अर्थ अभिप्रेत दिसतो. कै. राजकवि तांबे सुद्धा म्हणतात की, सारा संसार शृंगारभावनेच्या भोवती घिरटया घालीत आहे. तात्पर्य, साऱ्या भावना जीवनाच्या संगतीने अंकुरतात, पालवतात, फोंफावतात ( रसत्व पावतात ).

रस हे असे जीवनाबरोबर वाहाणारे आहेत. यावरून जीवन आणि रस यांचें भवितव्य सारखेच, हें उघड होय. आपल्या जीवनाच्या झुकावावरून आजच्या नवरसांच्या भवितव्यासंबंधी कांहीं अनुमान काढणें मनोरंजक वाटेल. तसा कांहीसा प्रयत्न येथे कर्तव्य आहे.

आपला आजतागाइतचा इतिहास एक बलवान आणि अनेक दुबळे असा वैषम्यमय आहे. शस्त्रयुगांत एका राजाची सत्ता अनेक दुबळ्या लोकांवर चालत होती. त्यानंतर अर्थयुगांत एका धनिकाची सत्ता अनेक निर्धन लोकांवर चालू लागली. आता, मानवयुगाची पहाट होण्याचीं सुचिन्हें दिसूं लागलीं आहेत. मानवयुगीन भारतांतील रामराज्याचें आपलें स्वप्न महात्माजींनी कसे रेखाटले आहे तें पहा—

I shall work for an India in which the poorest shall feel that it is their country in whose making they have an effective voice : an India in which there shall be no high class and low class of people : an India in which all communities shall live in perfect harmony. There can be no room in such India for the curse of untouchability... ... ... ...women will enjoy the same rights as men. Since we shall be at peace with all the rest of the world, neither exploiting nor being exploited, we should have the smallest army imaginable. All interests, not with conflict with the interest of the dumb millions will be scrupulously respected, whether foreign or indigenous. Personally I hate distinction between foreign and indigenous. That is the India of my dreams.

जेथे प्रत्येकाला अधिकार आहे; उत्तम-अधम, आपपर, प्रबल ( पुरुष ) अबला ( स्त्री ) असा भेद नाही, जेथे सैन्याचें प्रयोजन नाही तेथे समतेचें साम्राज्य आहे. खरोखर त्यास राम-राज्य म्हणण्यापेक्षा साम्य-राज्य म्हणणें अधिक योग्य वाटते. साम्य हा भावी युगाचा सुस्पष्ट संकेत आहे. " समानीव आकूतिः। समाना हृदयानि वः। समानमस्तु वो मनः।" हें मानवयुगाचें उपरसूक्त आहे.

साम्य आणि वैषम्य यांचा उगम आप-पर-भावांतून होतो. परकीय भाव उत्पन्न झाला की बलाबलाचा प्रश्न उभा राहतो. बलाचें कार्य निर्बलाची हिंसा. हिंसा आली की भयहि येतें. वैषम्य हें असें भयहिंसात्मक आहे. संस्कृतिबरोबर साम्यभाव विकासतो. भावनेची बैठक जितकी उंच तितकी ती भावना अधिक साम्यनिष्ठ. वैषम्य-हिंसा-भय याच्या उलट साम्य-अहिंसा-प्रेम ही त्रयी आहे.

या दृष्टीने शृंगारादि नवरसांचें स्वरूप पुढे कसें होईल याचा विचार करूं.

**शृंगार**—रतिभावाची विविध फोड करून त्याचे केवळ लैंगिक रति, सौंदर्य रति, व ममत्व रति हे भेद कसे पडतात तें मीं इतरत्र एका लेखांत दाखविलें आहे. ( चित्रमय-जगत् ऑ. १९४४ पृ. २३६-३७ ). रतिभावनेचे अनेक भेद पडतात, ते भेद असे—




केवळ लैंगिक रति वैषम्यानिष्ठ असते. तेथे प्रबल (पुरुष) हा भोगी व अबल (स्त्री) उपभोग्य वस्तु, असा संबंध असतो. बलाबलावर आधारलेल्या केवळ लैंगिकरतिमूलरसाचें स्वरूप असें भोग्यभोजकमय असतें. खरोखर, त्यांत शरीर-तृष्णेचाच भाग अधिक, मनोभावना नाही म्हटलें तरी चालेल. असंस्कृत अवस्थेंतील पुरुषाला स्त्री ही केवळ आपल्या चैनीची रक्तामांसाची बाहुली वाटत होती. आता, सुसंस्कृत पुरुषाला स्त्री ही आपल्याइतकीच 'माणूस' वाटते. तिच्यापासून कितीतरी आशा-आकांक्षाची पुरुषास अपेक्षा असते. अशी ही स्त्री पुरुषाची कामिनी होय. तिच्या शारीरभोगासाठी नव्हे तर सहवासासाठी पुरुष आसुसलेला असतो. भोगरतींत पुरुषाची दासी असलेली स्त्री अनुरागरतींत पुरुषाची प्रिय सहचरी बनते. अनुराग हें शृंगाराचें उज्ज्वल रूप होय. त्यात हर्ष, आशा, औत्सुक्य या भावना असतात व लोलुपता लोपून जाते. अनुराग हा समान स्त्रीपुरुषांतच उत्पन्न होतो. यास्तव अनुरागाचा स्थायिभाव लिंगभेदनिष्ठ समानरति समजावा.

**वीर**— हिंसेशी ( वैषम्याशी ) संबंधित असणाऱ्या वीरांत अपरसहिष्णुतावृत्ति असते. शत्रूचा पाडाव करणाऱ्या वीराचा बाहू क्रोधाने व पराक्रमाच्या ईर्ष्येने स्फुरण पावतो. शत्रूच्या पाशवी बळास खुलें आव्हान देणाऱ्या हिंसावीरांची भावना दुसऱ्याविषयीं अमर्षाची व तुच्छतेची असते. परंतु अहिंसावीर दुसऱ्याच्या पाशवी बळास आव्हान करीत नाहीं तर, मानवतेचें आवाहन करतो. तो शस्त्र उचलित नाहीं, तर आपणावर उगारलेल्या शस्त्राचें मोठ्या धीराने स्वागत करतो. तेथे शत्रुत्व कोठून असणार ? अहिंसावीर आपल्यावर शस्त्र उचलणाऱ्यास जणूं म्हणतो " मित्रा, अन्याय करीन म्हटलेस तर माझ्यांतील मानवता

तुझा प्रतिकार करील. आणि मारीन म्हटलेस तर तुझ्यांतील मानवता तुझा हात धरील !" अहिंसावीर दुसऱ्यास मारीत नाही तर त्यास जगवितो. अशा अहिंसावीराला धीर म्हणणे योग्य. धृति हा धीर रसाचा स्थायिभाव.

**करुण:**—या रसाचा संबंध जेव्हां श्रेष्ठकनिष्ठ भावाशी असतो तेव्हा, त्याच्या मुळाशी पालनाची वृत्ति असते. लाचारीने हात पसरणाऱ्या गरीबाला श्रीमंताने दान द्यावें, शरण आलेल्या दुबळ्याला समर्थाने आसरा द्यावा यांत पालनवृत्ति व श्रेष्ठकनिष्ठ भाव स्पष्ट दिसतो. अशा दयेला साम्ययुगांत वाव असणार नाही, असें वाटतें. उदयक्षितिजाची वाट चालणारे मराठी कवी आताच म्हणत आहेत की—

. " दया शब्द हा आता बनला पूर्व जान्मिची याद ! "

मात्र सहानुभूतीशी संबंधित असलेल्या कारुण्याचें भवितव्य उज्ज्वल वाटतें. सहानुभूतींत दयेपेक्षा कोमल सहकम्पाचा भाव जास्त असतो. एकास दुखापत झाली असतां दुसऱ्यास व्यथा व्हावी याच्या बुडाशी आत्मौपम्य ( औपम्यांत साम्य आलेंच ) असतें.

**हास्य**—व्यंगदर्शनमूल विनोद हिंसात्मक होय. त्यांत तुच्छतेचा भाव असतो. अशा हिंसात्मक हास्याचा संबंध युद्धप्रवृत्तीशी ( कुचेष्टेने दुसऱ्यास हाणून पाडणें ) लावावा हें योग्य वाटतें. समानभावमूल हास्याच्या बुडाशी क्रीडाप्रवृत्ति व संगप्रवृत्ति असते. तेथे मैत्रात्मक नर्म विनोदाचा फुलोर फुलतो.

**भयानक**—भयाचा संबंध विवर्जन-पलायन-वृत्तीशीं असतो. एक प्रबल व दुसरा निर्बल असल्याने हिंसेचा प्रसंग येतो तेव्हां भय उत्पन्न होते. साम्ययुगांत भयानक रस उरणार नाही असें वाटतें. त्याऐवजी नवाच 'सौहार्द' रस उदय पावेल. समानांतील प्रेमाची भावना कांही प्राचीन पंडितांना रसयोग्य वाटली नाही. समानांतील प्रेम पूर्वी अनुत्कट वाटलें असेल. तथापि भावी युगांत ती भावना रसयोग्य होईल यांत शंका नाही. सौहार्द-रसाचा स्थायिभाव लिंगाभेदनिष्ठ समानरति हा होय.

**वत्सल**—फक्त आपल्या पोटच्या पोरांना जपणें ही प्रवृत्ति माणसांत आहे तशी सर्वच प्राण्यांत आहे. गडकऱ्यांनी घनश्यामाच्या तोंडून सवाल केला आहे की, "माणसाची आई आपल्या मुलांना जपते, आणि राक्षसीण काय आपल्या मुलांचा फराळ करते? मग, एकीला राक्षसीण कां म्हणायचे आणि दुसरीला माणुसकीचा दाखला कां द्यायचा ?" या प्रश्नाचें हेंच तात्पर्य की, उदार ममता हें खरें मानवी वात्सल्य. तेंच वत्सलरसाचें भावी स्वरूप.

**भक्ति**—भक्तीचा देवभक्ति असाच अर्थ झालेला दिसतो. देवमूर्तीची भक्ति ही भावना रसयोग्य होणे हें अस्वाभाविक होय, असा प्रा. पंगूंचा अभिप्राय आहे. भक्ति-भावना उत्कट आस्वाद्य कां असूं शकत नाही याचें कारण माणूस आणि दगड यांत समान-वर्गत्वाचा अभाव असतो. कोणताहि स्थायि भाव उत्कट होत जाण्यास त्याचा आलंबन-विभाव एखादी मूर्त वस्तूच काय पण मनुष्यव्यक्तीच असणे जसें जरूरीचें आहे, तसाच तो मानसशारीरसुखाच्या दृष्टीने जितका जिव्हाळ्याचा व निकटचा असेल तितका तो स्थायि-भाव अंशाअंशाने अधिकाधिक उत्कट होत जातो असा नियम आहे. जड मूर्तीशी सजीव मनुष्यप्राण्याची समानवर्गत्वाच्या व मानसशारीरसुखाच्या अभावी रसपरिपोषाला अवश्य असणारी तन्मयता होणे शक्य नसल्याने देवताभक्ति हा रस होऊं शकत नाही अशी पंगूंची

उपपत्ति आहे. परंतु, देवाशी समरस होणाऱ्या भक्ताला देवाची मूर्ति दगडाची वाटते का, हा प्रश्न विचारणीय आहे. पण, येथे भक्तिरसाच्या मान्यतेचा विचार किंवा पंगूंच्या उपपत्तीची मीमांसा कर्तव्य नाही. माझा येथे मुद्दा इतकाच की, भक्तिरस जो आता आटत चालला आहे त्याचें कारण फार निराळें आहे. त्या कारणाचा संबंध समान वर्गाशी नव्हे तर समानतेशी आहे. मानवावर सत्ता चालविणारी कांही अधर्षणीय परात्पर शक्ति आहे यावर आता विश्वास राहिलेला नाही. हुकुमशहा देवानें मनुष्याला उत्पन्न केलेले नाही, तर उलट "देवदानवा नरें निर्मिलें !" हें मत आताच्या जड युगांतील कवी लोकांना 'कळवूं' इच्छितात. ईश्वर आणि माणूस हें वैषम्य आता नाहीसें होत आहे आणि मानवसेवा म्हणजेच ईश्वरसेवा हें तत्व मान्यता पावत आहे; त्यांत देवभक्तीच्या ओहोटीचे रहस्य आहे. देवतामूर्तीची भक्ति नव्हे तर— 'मानवतेस्तव लय पावावे !' ही भक्ति मानवयुगकालीन रसयोग्य भक्ति होय.

**अद्भुत**—जिज्ञासा ही हिंसामूल किंवा अहिंसामूल असूं शकते. हिंसेशी संबंधित असलेल्या जिज्ञासेंत भयाचा भाग असतो. हिंसोत्पन्न विस्मयांत आत्महीनता, दैन्य उत्पन्न होऊन वृत्ति मूढ बनते. अहिंसोत्पन्न विस्मयांत सुरक्षितता आणि हर्ष या भावना असतात. अशा प्रकारच्या विस्मयास कौतुक म्हणतां येईल.

**शान्त**—या रसाचा शम हा स्थायिभाव व ब्रह्मनिष्ठा हा विभाव सांगितलेला दिसतो. जगाला विटून वैतागानें किंवा वैराग्यानें ब्रह्मांत लीन होऊं इच्छिणाऱ्या मुमुक्षूचा अनिर्वचनीय आनंद कांहीहि असो. मानवयुगीन माणूस ब्रह्मापेक्षा मानवतेंत लीन होण्यांतच स्वतःस कृतार्थ मानील असें वाटतें. ही मानवनिष्ठा शमात्मक नव्हे तर समात्मक आहे. अशा या रसास सम हें नांव योग्य वाटतें. सर्वेकप आत्मभाव हा त्यांतील स्थायिभाव. असो.

आजच्या शृंगारादि रसांत पुढे जीवनपरत्वें कसा फरक पडूं शकेल त्याचें भावार्थानें स्थूल वर्णन करण्याचा प्रयत्न मीं येथें केला. आजच्या शृंगार, वीर, करुण, हास्य, भयानक, अद्भुत, शांत, भक्ति आणि वत्सल यांचे भावी मानवयुगांत (तेंच रामराज्य) अनुराग, धीर, कोमल, नर्मविनोद, सौहार्द, कौतुक, सम, (मानव) भक्ति व ममता असे नवरस होतील हें अनुमान करण्यास प्रत्यवाय वाटत नाही. कोणास हें निव्वळ मनोरंजन किंबहुना स्वप्नरंजन वाटेल. (रामराज्य हें अजून स्वप्नच नाही तर काय?) यांत कसलेंहि रंजन असो. त्यांत विश्वास आणि आशा आहे हें मात्र मला सांगावेसें वाटतें.

---

## साभार स्वीकार—

**मशाल**— साप्ताहिक (संपादक, प्रकाशक— अनिल कोठारी, व्हिक्टोरिया मिल कंपाउंड, गांवदेवी. मुंबई ७) दि. १५ मे पासून अवतीर्ण झालेलें हें साप्ताहिक लवकरच दैनिक स्वरूपांत परिवर्तन पावणार आहे. साम्राज्यशाहीविरोधी लोकसत्ताक व समाजसत्तावादी शक्तींच्या (म्हणजे सोविएत युनियनच्या) बाजूनें ही 'मशाल' उभी राहील, असें पहिल्या अंकाच्या संपादकीय निवेदनांत घोषित करण्यांत आलें आहे. 'श्रमजीवी जनतेचा आवाज' ह्या पत्रांत घुमत राहणार आहे. अर्थात् प्रक्षोभ हाच एक प्रधान रस ह्यांत असणार.

म. सा. प. (२२-१-४)

# संपादकीय

## महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें बत्तीसावें अधिवेशन

दक्षिण हैद्राबाद येथें १९४७ सालीं भरलेल्या अधिवेशनानंतरचें अधिवेशन मुंबईस १९४८ सालीं भरावयाचें होतें. पण त्या सालाच्या सुरुवातीसच महात्माजींचा खून झाल्यामुळें सर्वत्र भयाण अंधःकार पसरल्यासारखा झाला. त्या अंधःकाराच्या आश्रयानें गुंडगिरी बोकाळली, अनान्वित भीषण कृत्यांची लाट महाराष्ट्राच्या विशिष्ठ भागांत खेडोपाडीं फैलावली. त्या हवालदिल अवस्थेंत संमेलन भरविण्याची उचल घेणें अशक्य होतें. तेव्हां १९४९ सालावर तें अधिवेशन ढकलण्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं. आणि मुंबई साहित्य संघानें आपलें आमंत्रण मागें घेतल्यामुळें व दुसऱ्या कोणत्या गांवाहून न आल्यामुळें अधिवेशन नियमानुसार पुण्यास भरविणें ओघानेंच मुक्रर झालें. योगायोग असा कीं ह्याच वर्षीं पुणें नगरवाचनालयास शंभर वर्षें पुरीं होऊन त्यानें १०१ व्या वर्षांत पदार्पण केलें. ह्या निमित्त शतसांवत्सरिक महोत्सव करावा असें त्या संस्थेनें ठरविलें. त्याला जोडूनच हें बत्तिसावें अधिवेशन भरविण्याची कल्पना निघाली आणि वाचनालयाच्या कार्यकारी मंडळानें ती कल्पना हौसेनें अंगिकारून यशस्वीपणें पार पाडली.

संमेलन यशस्वीपणें पार पडलें. ही भाषा कोणाला सांप्रदायिक वाटेल. यशाचें माप निमंत्रकांच्या पदरांत घालायला पुष्कळांची तयारी नसेल ! व्यवस्थेंत उणीवा आणि गैरसोयी होत्या ह्याला चालकहि ना म्हणणार नाहींत. तथापि, संमेलनास येणारे जसे मराठी भाषेच्या प्रेमानें प्रस्फूर्त होऊन आलेले असतात तसेंच निमंत्रकहि झाले तरी ते मराठी भाषेच्या प्रेमानेंच संमेलनाचा अवाढव्य व्याप पत्करायला उद्युक्त झालेले असतात, हें लक्षांत घेतल्यास, आपण सारे एकाच कुटुंबांतले एकच कार्य पार पाडण्यास अन्योन्य सहकारी भावनेनें जमलेलों आहोंत असें वाटूं लागेल, ' तुम्ही नि आम्ही, ' निमंत्रक आणि अभ्यागत, अशी दुजा भावाची बाधक भाषा मूळ धरणार नाहीं आणि निमंत्रण देण्यापासून अखेरपर्यंत घेतलेल्या एकंदर उमोप परिश्रमाबद्दल निमंत्रकांना धन्यवादच द्यायला हवेत, हाच विवेक प्रभावी ठरेल.

* * *

अधिवेशनाचा त्रोटक वृत्तान्त आणि सर्व ठराव ह्याच अंकीं अन्यत्र सांपडतील. समग्र वृत्तान्त देण्याची आतां आवश्यकता आहे असें वाटत नाहीं. संमेलन झाल्याला दीड महिना होत आला. ह्या अवधींत बहुतेक नियतकालिकांतून त्याचा गोषवारा साभिप्राय येऊन गेला आहे. तो बहुतेकांच्या वाचनांत आलाच असेल. कांहीं अभिप्रायांतून नापसंतीचे सूर आढळले. पण आज शांत चित्तानें विचार करूं जातां, असें वाटतें कीं, अधिवेशनांत जें कार्य झालें त्याबद्दलहि नापसंती दाखविण्याला वाव नाहीं. "ह्या साहित्य संमेलनांत साहित्य नव्हतें, सोहळाच होता," ह्या आत्यंतिक अभिप्रायापर्यंतहि कांहींची मजल गेली आहे. पण त्यांनीं आपल्याला तपशीलाची निरनिराळया मथळयाखालीं बेरीज केली तर त्यांनाच त्या आपल्या ठोकळ अभिप्रायाला मुरड घालावी लागेल. कविसंमेलन व महिलांनीं केलेली चर्चा, ह्यांची गणना ' साहित्य ' सदरांत होत नाहीं काय ? संमेलनाची प्रधान अंगें

म्हणून योजलेले हे दोन कार्यक्रम वगळून विचार करायचा असेल तर मात्र ह्या संमेलनांत 'साहित्य' नव्हतें असें म्हणतां येईल ! पण हें म्हणणें "अहो, मुख्य पक्वानें वगळलीं तर या मेजवानींत भाज्या कोशिंबिरी ह्यांचीच गर्दी होती" असें म्हणण्यासारखें होईल.

समाधानासंबंधीं कित्येकांची कसोटीच इतकी प्रखर असते कीं, साहित्य-संमेलन असो, व्यापारी परिषद् असो किंवा ज्योतिष-परिषद् असो—त्यांना कांहींच यशस्वी झालेलें दिसत नाहीं. कसोटी उच्च बाळगणें यांत गैर कांहींच नाहीं. पण ती त्यांची कसोटी वैयक्तिक मताची निदर्शक असते, तर संमेलनांचे कार्यक्रम कार्यकारी समितींतील बहुसंख्य सदस्यांच्या मतांचा समन्वय घालून ठरविण्यांत आलेले असतात—ठरवावे लागतात हें ध्यानीं घेणें जरूर आहे. संमेलन आठआठ दिवस चालविणें शक्य कोटींतलें नसतें. तीन किंवा फार तर चार दिवसांत सर्व कारभार उरकायचा असतो, उरकावा लागतो. तेव्हां कार्यक्रमांची गर्दी न होईल तरच आश्चर्य. ठरावांचीच गोष्ट घ्या ना ? 'ठराव करणें' हा संमेलनाचा प्राण समजायचा असेल तर शब्दाशब्दासाठीं चालणारी घासाघीस व हमरीतुमरी क्षम्य मानायला पाहिजे आणि त्याप्रीत्यर्थ विषयनियामक समितीला लागेल तेवढा वेळ द्यायला पाहिजे. तिनें दुसऱ्या कार्यक्रमाला खो दिला कीं, तो धकाधकीचा ( Shunting चा) मामला पुढच्या अनेक कार्यक्रमाला बाधतो; आणि मग कुठें ना कुठें तरी आवर घालायची किंवा संक्षेप घ्यायची पाळी येते. सर्व कार्यक्रम यथासांग पार पडावेत यासाठीं प्रत्येकानेंच सावधगिरीनें संयम पाळला तरच, वेळच्या वेळीं कार्यक्रम उरकले जाण्याची शक्यता ! प्रा. माटे यांचा राजिनामा मंजूर करण्यासाठीं खर्ची पडलेला वेळ ध्यानीं घ्यावा. त्यासाठीं घालून-पाडून, अज्ञान पांघरून, विचारण्यांत आलेले प्रश्नोपप्रश्न ह्यांची 'साहित्यिक' म्हणविणाऱ्या सुबुद्ध व समंजस सदस्यांना आवश्यकता होती असें वाटत नाहीं. [ किंबहुना, साहित्यिकांशिवाय तो कलाविलास कोणाला साधला असता ? पण त्यापायीं असमयज्ञता पदरीं येत होती एवढें मात्र खचित ! ]

* * *

संमेलनांतील एकंदर कार्यक्रमाप्रीत्यर्थ खर्ची पडलेल्या तासांची फोड करून, साहित्य-विषयक कार्यक्रमांपेक्षा करमणुकीच्या कार्यक्रमांना अधिक तास खर्ची पडल्याचा हिशेब प्रसिद्ध झाला आहे. पण त्या हिशेबी गृहस्थांना ती फोड करण्यानें फार मोठी तफावत दाखवितां आली नाहीं; करमणुकीला अधिक मिळालेले तास अगदींच थोडे असल्याचें सिद्ध झालें ही त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट आहे. साहित्यसंमेलनांत इतक्या प्रमाणांत करमणूक असावी कां ? असा प्रश्न विचारल्यास, 'नसावी' असेंच बहुमत पडेल, हें खरें. आणि स्वतंत्रपणें उत्सव-संमेलन करण्याइतकी प्रतिष्ठा नाट्यशाखेला आली असल्यामुळें साहित्यसंमेलनांत रूढ नाट्यप्रयोगांवर इतका भर द्यायला नको हेंही खरें. ह्यापुढें, हें सारें तारतम्य ठेवून विवेकानें कार्यक्रम आखावा असेंच मी आग्रहानें प्रतिपादीन. तथापि, करमणुकीचे तास कमी केले असते तर प्रतिनिधींनी तशींच जाग्रणें साहित्यविषयक कार्यक्रमासाठीं केलीं असतीं, असें गृहित धरणें बरोबर होणार नाहीं. प्रतिनिधींना साहित्यविषयक कार्यक्रमाची चाड अधिक का नाट्यप्रयोगाची ओढ अधिक ह्याचें प्रत्यंतर संयुक्त महाराष्ट्राच्या ठरावाच्या वेळीं चांगलेंच आलें. कार्यक्रम आंखणारांनीं रात्रीं नाटक होईल म्हणून जरी ठरविलें होतें तरी, एव्हढा जिव्हाळ्याचा ठराव प्रतिपादिला जात असतांना खुर्च्या रिकाम्या कां पडाव्यात ? नाटकाचा एखादा अंक अंतरला असता तर काय बिघ-

डलें असतें ? वरें, नाटक ठेवलेंच नसतें तर ? तर त्या खुर्च्या ओस पडल्या नसत्या ह्याची काय शाश्वति ? जेवणाची वेळ झाली कीं सुजाण श्रोतेहि खुशाल चालू लागतात, हा प्रत्येक 'लांबलेल्या सार्वजनिक सभे'च्या वेळचा अनुभव नाहीं कां ?

* * *

अध्यक्ष आणि स्वागताध्यक्ष यांचीं भाषणें त्यांचा व्यासंग आणि व्यक्तिमत्व यांना अनुरूप अशींच झालीं. आचार्य जावडेकर यांच्या भाषणांत त्यांचा तत्त्वज्ञानी मनःपिंड प्रगटावा हें रास्तच होय. त्या तत्त्वज्ञानाच्या निकषावर चालू साहित्यनिर्मितीची त्यांनीं तपासणी केली असती, निदान चाचणी घेतली असती, तर ती अधिक उद्बोधक झाली असती. तत्त्वज्ञानाचे आशार्थी वा विध्यर्थी निष्कर्ष हे सर्वसामान्य श्रोत्यांच्या पचनीं पडायला कठीण असतात. उदाहरणांचें अनुपान सोबत असलें म्हणजे तें तत्वज्ञान अधिक सेव्य होतें. "आज नव्या निष्ठांनीं महाराष्ट्रीय अंतःकरणाची पकड घेतली असून त्या निष्ठांतून निर्माण झालेलें नव चैतन्य सौंदर्ययुक्त व लालित्यमय साहित्य निर्माण करूं लागलें आहे," असें ज्या ठिकाणीं आचार्य म्हणतात त्याच ठिकाणीं त्यांनीं लगेच अभिप्रेत वाङ्मयकृतींकडे अंगुलिनिर्देश केला असता तर आज अधांतरीं तरंगून मनाची जी अंदाजी समजूत घालावी लागते ती लागली नसती. कोणतेंहि तत्त्वज्ञान समाजाच्या सर्व थरांत मुरावला हवें असल्यास त्याचा अनुवाद ललित कृतींत व्हायला हवा. आचार्यांना मान्य असलेल्या तत्त्वज्ञानाचा ठसठशीत किंवा ओझरता ठसा ज्या ललित कृतींत आढळला असेल त्यांचें विवेचन, निदान उल्लेख, जरी त्यांच्या भाषणांत ओघानें आले असते तरी ते मार्गदर्शी ठरले असते. त्याच्या अभावीं—

वरुन चालले विमान । बघतो वर करुनि मान
जाणवतो मानेला । बसलेला मात्र ताण

अशी श्रोत्यांची—सर्वसामान्य श्रोत्यांची—गत झाली.

एरव्हीं, त्यांचें भाषणांतील प्रतिपादन आत्मविश्वासपूर्ण होतें. शब्दाशब्दामागें असलेली बालंबाल खात्री प्रतीत होत होती. परिणामीं, विचारवंतांच्या मनाला त्यानें गती दिली. नवभारताच्या निर्मितीसाठीं सर्वोदयवादी सत्याग्रहनिष्ठेचीच कास धरणें कसें आवश्यक आहे ह्या मीमांसेवर त्या व्याख्यानांत भर दिलेला आहे. अन्तश्चक्षूसमोर 'आदर्श मानव' म्हणून महात्माजींची प्रतिमा असून त्या आदर्श मानवाच्या विभूतिमत्वाचें पृथक्करण जणु काय त्यांनीं ह्या भाषणांत केलें. ह्या आदर्शमानवानें दिलेली जीवनदृष्टि आणि जीवननिष्ठा ह्यांच्यापासून मिळणाऱ्या प्रेरणेंतूनच नवी कला, नवें साहित्य आणि म्हणूनच नवा भारत निर्माण होणार आहे असा त्यांचा अभिप्राय.

* * *

कविसंमेलनाचे अध्यक्षस्थानीं प्रा. श्री. वा. रानडे आणि स्वागताध्यक्षपदीं श्री. विठ्ठलराव घाटे यांची योजना करून संमेलन चालकांनीं उपकारच केले, असें म्हणावेसें वाटतें. ही नियुक्ति जर झाली नसती तर ह्या दोघांचे विचार व विवेचन यांचा लाभ झाला नसता. दैनंदिन व्यापांत श्री. घाटे हे इतके व्यग्र असतात कीं, 'कवि' ह्या त्यांच्या उपाधीची त्यांना मुद्दाम आठवणच करून द्यावी लागते ! त्यांचे स्वागताध्यक्षीय भाषण चटकदार झालें, चिमखड्यासारखें झालें, स्पष्टोक्तिपूर्ण झालें. 'कांहीं म्हातारे व एक म्हातारी' ह्या मार्मिक व्यक्तिरेखा चितारणाऱ्या साहित्यिकाची ह्या भाषणांत पुन्हा लेखणी चमकली. नव

कवितेतील ( Cynicism ) अतिवास्तववाद व विकृत मनोविश्लेषण ह्यांचा त्यांनीं स्पष्टपणें अधिक्षेप केला. अहमदाबाद येथें निघणाऱ्या 'संस्कृति' नामक गुजराथी मासिकाच्या जूनच्या अंकांत, श्री. घाटे यांच्या भाषणांतील अतिवास्तववादी कवितेबद्दलचा भाग अनुवादित करण्यांत आला आहे, हें ध्यानांत घेण्यासारखें आहे.

प्रा. रानडे यांनीं आधुनिक मराठी कवींच्या तीन पिढ्या पाहिल्या आहेत. सर्व प्रकारांशीं समरस होण्याइतकी त्यांची रसिकता उदार आहे. विचक्षणा करण्याची त्यांची मति अभ्यासानें सूक्ष्म व प्रखर बनली आहे. त्यांचें भाषण म्हणजे गेल्या चाळीस वर्षांतील काव्य-क्षेत्रांतील प्रश्नोपप्रश्नांचा विशाल चित्रपटच! सद्यःकालीन सामान्य रसिकाचें त्यांनीं केलेलें चित्रण हृदयस्पर्शी आहे. तें वाचतांना पोटांत कालवाकालव झाल्याशिवाय राहात नाहीं, आणि रानडे यांच्यांतील 'कवि' अजून जागा आहे अशी साक्ष मिळते.

म. म. द. वा. पोतदार यांचें स्वागताध्यक्षीय भाषण किती सरस व माहितीपूर्ण झालें ह्याची साक्ष पृ. ४६ वर मिळेल. "त्यांतील उत्कृष्ट विचाराचा पगडा परस्पर वेळींच प्रौढ विद्यार्थ्यांवर बसविल्यास त्यांना स्फूर्ति मिळेल व भावी आयुष्यांतील त्यांचें आचरण देशाच्या उन्नतीस हातभार लावील" हे एका शिक्षणशास्त्रज्ञाचे उद्गार इथें नमूद करण्यासारखे आहेत.

* * *

यंदाच्या कविसंमेलनांत जर विशेष ऐतिहासिक अशी कोणती गोष्ट घडली असेल तर श्री. स्नेहरश्मी व श्री. उमाशंकर जोशी ह्या दोघां गुजराथी कविवर्यांची उपस्थिति. आपल्या सीमां-वरील भाषाभगिनींच्या सुपुत्रांना निमंत्रण देऊन सन्मानपूर्वक बोलावून घ्यावें ही स्वागताध्यक्ष श्री. घाटे यांची कल्पना. त्याचप्रमाणें कन्नड कवींना देखील निमंत्रण गेलें होतें. पण ते येऊं शकले नाहींत. निमंत्रणाला मान देऊन गुर्जर कविद्वयानें आपल्या उपस्थितीनें संमेलनाला उपकृत केलें व आपले विचार श्रोत्यांना ऐकविले. हा स्नेहभाव असाच वृद्धिंगत होत जावो.

* * *

ध्रुव, रोहिणी, मनोहर, नवभारत ( मासिक ) व ज्ञानप्रकाश ह्यांनीं संमेलन विशेषांक काढले होते. ह्यांची ही सेवाहि संस्मरणीय होय. ह्या अधिवेशनाचा संदेश गुर्जर बांधवांना पोंचविण्याची तत्परता 'संस्कृती'नें दाखविली ह्याबद्दल तिलाहि मनःपूर्वक धन्यवाद.

* * *

## जाहिराती व सद्‌भिरुची

कांहीं नियतकालिकांतून व ग्रंथांतून अश्लील मजकूर येतो. सर्वांचाच निषेध करणें शक्य नसतें. तथापि सद्‌भिरुची नष्ट झाली नाहीं, वाचक जागरूक आहेत आणि त्यांना अश्लीलतेबद्दल संताप येतो याचीं निदर्शनें मधूनमधून व्हायला हवींत. अश्लीलतेचा अंगीकार करणारांना त्यामुळें कांहीं संकोच वाटण्याचा व विवेक सुचण्याचा संभव असतो.

ही अश्लीलता जाहिरातींतही कांहीं कमी नसते! किंबहुना कांहीं जाहिरातींत ती अधिक नग्नतेनें वावरते. श्री. कृष्णराव मराठे यांनी असल्या कांहीं जाहिराती गेल्या महिन्यां-तच संपादकाच्या नजरेस आणल्या आहेत. खरोखरीच त्या सद्‌भिरुचीचा अपमान करणाऱ्या आहेत; आणि एरव्हीं अभिरुचीची चाड बाळगणाऱ्या नियतकालिकांत त्या दिसतात म्हणून विशेष खेद वाटतो. नियतकालिकांच्या कचेरीमध्यें मजकूर खातें आणि जाहिरात खातें असें

वेगवेगळे विभाग असतात. मजकुराची जुळवाजुळव करणाऱ्या संपादक-वर्गाची जाहिरातींबाबत पसंती-नापसंती विचारली जात नसेलहि! तरीपण जाहिरात खात्यांतील जबाबदार व्यक्तींनी आपल्या नियतकालिकाची प्रतिष्ठा सांभाळायला हवीच. सुग्रणपणानें केलेल्या स्वयंपाकाची थाळी ज्या जागीं मांडायची ती जागा सुद्धां शुचिर्भूत व प्रसन्न नको कां? थाळीभोंवतीच्या रांगोळीला सुगंध नसला तरी दुर्गंध खासच नसावा.

अशा प्रकारच्या सदभिरुचीस न मानवणाऱ्या जाहिराती छापूं नयेत म्हणून परवांच्या म. सा. संमेलनानें एका ठरावानें वृत्तपत्रें व नियतकालिकें यांच्या चालकांना विनंती केली आहे. संमेलनाचें यशापयश आजमावून त्याच्या अपयशाबद्दल टीका करण्याचा हक्क नियतकालिकें बजावतातच. संमेलनाच्या पदरांत यशाचें अधिक माप पडावें अशी त्या टीकेच्या पोटीं अर्थातच प्रामाणिक इच्छा असणार. ठरावरूपानें त्यांना केलेल्या ह्या विनंतीचा मान राखण्याची तत्परता दाखवून व संमेलनाचें यश वाढवून बाकीच्या अपयशाबद्दल टीका करण्याच्या आपल्या हक्काला तीं बळकटी आणतील काय?

* * *

ह्याच ठरावाच्या उत्तरार्धांत,सरकारनें अशा जाहिरातींवर कायद्यानें नियंत्रण आणावें, अशी शिफारस आहे. पण आपल्या सदभिरुचीला असभ्य जाहिरातींच्या नक्षत्रमाळा नसाव्यात हें सांगायला सरकार हवें काय? सरकारला या शिफारसीचें हसूंच येईल. सरकारवर ही पाळी येणें म्हणजे नियतकालिकांनीं आपली आपणच शोभा करून घेण्यासारखें होणार आहे.

जाहिरातींचा प्रसार नियतकालिकांच्या द्वारांच केवळ होत नसतो, हें खरें; पण सरकारला कायद्यानें अशा जाहिरातींचें नियंत्रण करायची पाळी आली तर "त्या जाहिरातींच्या प्रसाराला आम्ही जबाबदार नाहीं" असें छातीठोकपणें नियतकालिकांना सांगता आलें पाहिजे.

* * *

वाचकांचा अपमान करणाऱ्या आणखीहि कांहीं जाहिराती असतात. त्या जाहिरातींना नियतकालिकांनीं आपलें अंगण खुलें करून देतां कामा नये. हें आज सांगतांना आमच्या डोळ्यापुढें "साखरपुडा" बोलपटाची जाहिरात आहे. "मराठी पण मधुर" ह्या बिरुदानें या बोलपटाची जाहिरात आज अनेक आठवडे मराठी वृत्तपत्रांतून मिरवली जावी ह्याची मराठीच्या अभिमान्यांना चीड वाटते. पण त्या जाहिराती छापणारांना देखील खंत वाटते काय, असा प्रश्न आहे. अशा जाहिरातींचें नियंत्रण कायद्यानें करणेंहि कठीण आहे. तेव्हां मराठी वृत्तपत्रांनीं स्वतःच सावध राहणें जरूर आहे. मराठीच्या संतानांनीं आपल्या आईची नालस्ती मुकाट्यानें मान्य केली तर—

—येथें कोणाचें काय बा गेलें
ज्याचें त्यानेंच अनहित केलें—

असें होणार आहे.

## डांग आणि महाराष्ट्र.

महाराष्ट्राच्या सीमाप्रांतांतील मराठी भाषिकांवर जें आक्रमण होत आहे त्याबद्दल निषेध आणि तेथील भाषाविषयक प्रश्नाकडे जागरूकपणें लक्ष पुरवून ते लोकशाहीच्या पद्धतीनें सोडविण्याचे नेटानें प्रयत्न करण्याबद्दल म. सा. परिषदेला आदेश, असा एका ठरा-

वाचा भाग आहे. डांगची भाषा गुजराती ठरावी अशा प्रकारचे आक्रमक प्रयत्न होत होते. पण संतोषाची गोष्ट अशी कीं, म. सा. संमेलनाचें अधिवेशन संपतें न संपतें तोंच मुंबई सरकारचा निर्णय जाहीर झाला कीं, डांगची भाषा मराठीच आहे. ह्या न्याय्य निर्णयाबद्दल म. सा. परिषदेनें सरकारचें तत्परतेनें अभिनंदनहि केलें.

पण निर्णय कितीहि न्याय्य असला, तरी तो एका पक्षाला स्वागतार्ह वाटतो आणि दुसऱ्याला तो अन्याय्य वाटतो, जुलमाचा वाटतो. मुंबई सरकारच्या उपरोक्त निर्णयामुळें गुजराती साहित्य-सभेला अर्थातच असमाधान वाटूं लागलें असून, हा निर्णय रद्द व्हावा अशा दृष्टीनें त्यांचे प्रयत्न सुरू होत आहेत. मुंबई सरकारचा हा निर्णय लोकशाहीविरुद्ध आहे, महाराष्ट्रीयांच्या प्रचाराला व भावनेला सरकारनें बळी पडून हा निर्णय दिला आहे, अशा तऱ्हेची हाकाटी सरूं झाली आहे. माझें तें माझें आणि तुझें तेंहि माझें, अशा तत्त्वज्ञानानें प्रेरित झालेला एक गट (—आणि त्यांत थोर थोर लोक आहेत—) आतां मध्यवर्ती सरकारकडे धांव घेण्याची भाषा बोलूं लागला आहे, मुंबई सरकारनें हा निर्णय देणें म्हणजे मध्यवर्ती सरकारच्या अधिकारावर अतिक्रमण आहे, अशी चिथावणी देऊं लागला आहे. साराश, मुंबई सरकारच्या निर्णयाविरुद्ध बराच कोलाहल माजविण्यांत येत आहे. ओघानेंच आलें कीं, महाराष्ट्र साहित्य परिषदेला या संबंधांत जागरूक राहावयाला हवें आणि तसे प्रयत्न जोरानें सुरू झाले आहेत.

## कार्याध्यक्षाचा राजीनामा व नवीन निवडणूक

प्रा. श्री. म. तथा बापूसाहेब माटे यांनीं मे महिन्यांत म. सा. परिषदेच्या कार्याध्यक्षपदाचा राजीनामा दिला आणि तो स्वीकारण्यांत आला. ही घटना अनेक दृष्टींनीं खेदजनक झाली. बापूसाहेबांनीं हें कार्याध्यक्षपद स्वीकारल्यापासून म. सा. प. ची सेवा मनोभावें केली, तिचा संसार चढता-वाढता व्हावा अशा उद्दिष्टानें विविध कार्यांची आंखणी करून त्यांचा गाडा चालता राहील असे सतत परिश्रम केले. 'रचिला ज्याचा पाया त्याची बरी उभारणी झाली' असें त्यांना वाटत होतें आणि त्या उत्साहानेंच उर्वरित पल्ला गांठण्याची त्यांना उमेद होती. असा उत्साही व कर्तबगार कार्यकर्ता परिषदेच्या प्रपंचांतून एकाएकी बाजूला व्हावा, ह्याचें परिषदेच्या हितैषींना वाईट वाटल्याशिवाय कसें राहील ?

आतां कार्याध्यक्षाचे जागीं प्रा. रा. श्री. जोग यांची अविरोध निवड झाली आहे. गेल्या तीन वर्षांत ज्या योजनांची आंखणी झाली, थोडाबहुत निधि जमा करण्यांत आला आणि कार्यांना सुरुवात झाली, त्या सर्वांची धुरा उचलून तड गांठण्याची अवघड कामगिरी त्यांच्याकडे आली आहे. समाधानाची गोष्ट अशी आहे कीं, प्रा. जोग परिषदेच्या अनेक कार्यांत मनोभावें झटत आले आहेत आणि उपरोक्त योजना आंखल्या जात असतांना आरंभापासून ते त्यांत आहेत. तेव्हां, ते परिषदेच्या संसाररथाची गति कुंठित होऊं देणार नाहींत आणि इष्टकार्यें सिद्धीस नेतील असा विश्वास वाटतो.

* * *

## विलीन संस्थानांतील सरकारी छापखाने

या मथळ्याचा एक लेख, रा. रा. कृ. के. राहाळकर ( अलिबाग ) यांनीं लिहिलेला, दैनिक 'लोकमान्य' च्या ता. २१-६-४९ च्या शहर आवृत्तींत प्रसिद्ध झाला आहे. ह्या

छापखान्यांचा उपयोग करण्याबद्दल त्यांत ज्या कांहीं सूचना आहेत त्यांत एक पुढील-प्रमाणें आहे:—

"अखिल महाराष्ट्रांत—बृहन्महाराष्ट्रांत—मराठी भाषेच्या प्रगतीसाठीं प्रयत्न करणारी म. सा. परिषद् ही प्रातिनिधिक संस्था आहे. या संस्थेला एखादा छापखाना देणगी म्हणून दिल्यास फार उपयुक्त होईल. ही संस्था सर्वस्वी लोकाश्रयावर चालणारी आहे. तिला राजाश्रय मिळणें जरूर आहे......आतांपर्यंत या संस्थेवर झालेला अन्याय अशा तऱ्हेच्या छापखान्याच्या देणगीनें सरकारला दूर करतां येईल. स्वतःचें त्रैमासिक, इतर प्रकाशन करून, या संस्थेला बाहेरचीं कामें करूनहि उत्पन्न वाढवतां येईल व ती जास्त कार्यक्षम बनेल.......स्वराज्यांत अशा मदतीची अपेक्षा करणें चूक ठरणार नाहीं."

श्री. राहाळकर यांची सूचना स्वागतार्ह आहे. परिषदेचा प्रपंच ओढगरतीचा आहे. खर्चाची तोंडामिळवणी कशीबशी मोठ्या कष्टानें होत असते. नडी अडचणीला, मोठ्या खर्चाच्या योजनेच्या वेळीं परिषद् मराठी भाषाप्रेमी संस्थानिकांकडे धांव घेत असे. तो आधार आता उरला नाहीं. परिषदेला उद्दिष्टसुसंगत असा धनोत्पादनाचा व्यवसाय करणें व स्वावलंबी होणें भाग आहे. अशा परिस्थितींत एखादा सर्वांगपरिपूर्ण असा छापखाना सरकारनें तिला बहाल केल्यास तिची नड भागणार आहे. ह्या अपेक्षेंत चूक नाहीं इतकेंच नव्हे, तर संस्थानांच्या मालमत्तेंत नैतिक हक्काची भागीदारीच आहे. तरी सरकारनें ही सूचना मनावर घ्यावी अशी विनंती आहे.

—य. दि. पेण्ढरकर

---

## साभार स्वीकार—

### नवा महाराष्ट्र ( त्रैमासिक )

कै. आगरकरांच्या ५४ व्या स्मृतिदिनास म्हणजे दि. १७ जून ला ह्या त्रैमासिकाचा जन्म झाला. बुद्धिवादी दृष्टीनें समाजवादाच्या ध्येयाचा नि त्याच्या शास्त्रशुद्ध मार्गाचा पुरस्कार करणाऱ्या विचारवंतांच्या विनिमयाला हें त्रैमासिक सहाय्यभूत होईल आणि समाजवादाच्या दिशेनें जाणतेपणानें वाटचाल करूं पाहणाऱ्यांना त्या वाटचालीमध्यें पाथेय म्हणून क्रांतिकारी बुद्धिवादाचें साहित्य जमवून द्यावें असें ह्या त्रैमासिकाचें ध्येय सांगण्यांत आलें आहे. वृत्तपत्रव्यवसायी आणि अनुभवी प्रकाशक असे श्री. ह. श्री. शेणोलीकर आणि द. रा. कानेगांवकर हे उभयतां ह्या नियतकालिकाचे संपादक आहेत.

पहिल्या अंकांत आचार्य जावडेकर, आचार्य भागवत, प्रा. सरदार, प्रा. नलिनी पंडित, प्रा. संत, प्रा. अ. रा. कामत, श्री. दि. के. बेडेकर इत्यादि विचारवंतांचे लेख आले आहेत. प्रस्तुत नियतकालिक यशस्वी होईल अशी उमेद आहे. ( पत्ता— २९२।२ नारायण पेठ, पुणें २. )

* * *

**हांक**— (लेखक नाखवा. प्रकाशक समर्थ प्रकाशन, टिळक चौक, बेळगांव; मूल्य प्रचार ) चिमुकल्या सहा रूपक कथा ह्या पुस्तिकेंत असून, स्वतंत्र व बलशाली भारतांतील नागरिकांना असहाय्य आशावादी गोवेंकरांनीं मारिलेली ही एक हांकच आहे. असें श्री. दत्तात्रय व्यंकटेश पै ह्यांनीं परिचयांत सांगितलें आहे.

## शोकसमाचार

### डॉ. रामकृष्ण हरि भडकमकर, एम् ए, एम्. डी.

एप्रिलची १३ तारीख उजाडली; आणि पुणेकरांनीं स्थानिक दैनिकें उघडलीं मात्र! तोंच त्यांच्या नजरेस काळीभोर बातमी पडली कीं रात्री १–३० वा. डॉ. भडकमकर यांचें देहावसान झालें!

' महाराष्ट्राचा धन्वन्तरी गेला ' ह्या सार्वजनिक उद्गारांत त्यांच्या व्यवसायनैपुण्याचें सार साठविलें आहे. त्यांच्या प्रेतयात्रेंतून चाललेल्या एका व्यक्तीनें " आमचा तुकाराम वैकुंठाला गेला. " हे जे कळवळून उद्गार काढले त्यांत त्यांच्या जीविताचें सार सांठविलें गेलें आहे. सारांश, व्यवसाय व जीवित ह्या दोन्ही बाबतींत डॉ. भडकमकर ही व्यक्ती असामान्य होती. प्रखर बुद्धिमत्ता, दयार्द्र अन्तःकरण, द्रव्याविषयीं अनासक्ति, औद्योगीकरणानें देशाच्या अभ्युदय व्हावा यासंबंधीं तळमळ व तनमनधनानें राबण्याची तत्परता, गाढ भक्तिभाव, असीम रसिकता आणि खंबीर मनोविजय अशा अत्युच्च गुणांनी त्यांच्या व्यवसायनिपुणतेला रत्नखचित अलंकारांची शोभा आली होती. अनेक संस्था उभारून चालस्या करण्यांत त्यांनीं भाग घेतला होता. आयुर्वेदाला सरकारमान्यता लाभली ह्याला त्यांचे परिश्रम कारण आहेत. स्वराज्यप्राप्तीसाठीं जो प्रदीर्घ काळ संग्राम चालला होता त्यांतहि आपली भूमिका स्वयंप्रेरणेनें स्वीकारून वेळोवेळीं करावा लागणारा यज्ञ मनोभावें केला. आळंदी–पंढरीची वारी असो, क्रिकेटचा सामना असो, किंवा काव्यगायन असो,–अनेक उद्योग सांभाळून अशा विविध कार्यांतहि ते समरस होत. आळस तर त्यांना माहीतच नव्हता. रुग्णाइताचे दुःख हलकें करवेल तितकें करावें म्हणून ते अखेरपर्यंत नुसते निरलसपणेंच नव्हे तर, आपल्या व्याधिग्रस्त विकल शरीराची फिकीर न करतां खपले. जगाला विटलेला एखादा रुग्णाईत असो कीं आपद्ग्रस्त असो, डॉ. भडकमकरांच्या सहवासांत तो कांहीं काळ आला तर त्याची विमनस्कता लोपून त्याला जगांत जगण्याचा धीर यावा असें त्यांचें व्यक्तिमत्व होतें. देशाची उंची मोजण्याचे जे मानदंड असतात त्यांत डॉ. भडकमकरांची प्रामुख्यानें गणना व्हावी. अशी लोकोत्तर विभूति दिवंगत झाल्यामुळें लक्षावधि अंतःकरणें हळहळलीं असतील.

× × ×

### श्री. लीलाबाई पटवर्धन, जी. ए.

शनिवार दि. ७ मे रोजीं अस्तमानोत्तर श्री. लीलाबाई पटवर्धन कालवश झाल्या. कवि माधव ज्यूलियन तथा डॉ. माधवराव पटवर्धन यांच्या ह्या पत्नी. माधवरावांच्या अकाल मृत्यूनें महाराष्ट्र सारस्वताची केवढी मोठी हानी झाली असेल, ह्याची कल्पनाच करायला हवी. वयाच्या पंचेचाळीसाव्या वर्षी ( २९ नोव्हेंबर १९३९ ) ऐन उमेदीच्या भरांत हा प्रतिभावान् कवि, चतुरस्र व्यासंगी साहित्यिक हारपला, ह्याचें दुःख उभ्या महाराष्ट्राला झालें. आज दहा वर्षे होत आलीं त्या आपत्तीला; पण ती आपत्ति जणुं कांहीं परवांच ओढवली इतका ताजेपणा आहे त्या दुःखांत! त्यांच्या पश्चात् लीलाबाई देखील तशाच अकालीं दिवंगत झाल्या.

म. सा. प. ( २२-१-५ )

अनुक्रमणिका

माधवरावासारख्या लोकविलक्षण व्यक्तीची सहचारिणी ही भूमिका मोठ्या कसोटीची होती. ती त्यांनीं समंजसपणानें सांभाळली, चोखपणानें बजावली आणि माधवरावांना संसारी व व्यवहारी नागरीक बनविण्याचें बरेंचसें श्रेय संपादन केलें. अर्थात् ह्या त्यांच्या यशांत माधवरावांच्या कर्तव्यनिष्ठेचा आणि त्यागशीलतेचाहि तितकाच भाग होता. त्यांना अवघ्या ११ वर्षांचे सहजीवन लाभलें. परवां 'Survivor' ह्या मथळ्याचा एक चुटका वाचनांत आला; तो असा होताः—

They had lived so long together—
Sixty years since they were wed—
When she died , he wondered whether
She or he himself was dead.
Harold Willard Gleason

ह्या दुःखोद्गारांतहि एक भूषणावह अभिमानास्पद वस्तुस्थिति आहे. असें दीर्घकालीन सहजीवन, अभेदरूपता येणारें सहजीवन लाभूं नये हा केवढा घोर शाप! "आमची ११ वर्षे" हें लीलाबाईंचें पुस्तक. ह्यातील "आकरा" हा शब्द उपरोक्त चुटक्यांतील दीर्घकालीनतेसमोर ठेवल्यास, शापाची हृदयाविदारकता ध्यानीं येईल.

श्री. लीलाबाईंचा हा आत्मचरित्रपर ग्रंथ मराठी वाङ्मयांत संस्मरणीय ठरेल. माधवरावांचें चारित्र्य आणि व्यक्तित्व त्यांनीं मोठ्या मार्मिकपणानें विशद करून पत्नीचें जसें कर्तव्य बजावलें आहे तसेंच महाराष्ट्र सारस्वताच्या चरित्रपर ग्रंथांत मोलाची भर घालण्याचें कार्यहि पार पाडलें आहे. स्मृतिचित्रें, स्मरणसाखळी, अशा ग्रंथांच्या पंगतींत आत्मगुणानें चमकणारें असेंच हें पुस्तक असल्याची कोणीहि ग्वाही देईल. माधवरावांचें कांहीं वाङ्मय ग्रंथबद्ध करण्याचीही त्यांनीं कामगिरी केली आहे त्यांचें निधन मराठी वाङ्मयाला हानिकर आहे.

येवो अथांग पाणी । वारा असो तुफानी
जावो पुढेंच तारू । हें खात हेलकावे
आकाशिच्या कुऱ्हाडी । माथा खुशाल पाडी
आघात सोसण्याचें । सामर्थ्य मात्र द्यावें

असें म्हणत श्री. लीलाबाईंनीं माधवरावांच्या पश्चात् गेलीं दहा वर्षे काढलीं. आतां त्यांच्या पश्चात् त्यांचीं पोरकीं अपत्यें दिनू व सुधा यांना हेच उद्गार जपण्याची पाळी आली आहे. ह्या उद्गारांतील निष्ठा व इष्टमित्रांची पाठराखणी ह्यांनीं त्यांना धीर येईल व श्री. लीलाबाईंच्या आत्म्यास शांति लाभेल अशी आशा आहे.

य. दि.

× × ×

## — परीक्षणें —

**माणुसकीचा गहिंवर ( लघुकथासंग्रह ) —**

लें० व प्रका०— प्रा. श्री. म. माटे, एम्. ए.; टिळक रस्ता, पुणें शहर.
किं. तीन रु.

मराठी वाङ्मयांत ‘ शैलीकार ’ हें बहुमानार्थी व यथार्थ नांव मिळविणारे प्रा. बापूसाहेब माटे यांचा हा ‘ कथासंग्रह ’ आहे एवढी या पुस्तकाची ओळख वाचकांना पुरेशी आहे. आतांपर्यंत प्रा. बापूसाहेब यांनीं लहान मोठीं १२ पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत व त्यांमध्यें तत्वज्ञान, विज्ञान, कथा, टीका, रूपांतरे, भाषणें वगैरे अनेक विषय व लेखनप्रकार येऊन गेले आहेत. हें सारें लिखाण अस्सल मराठी वळणाच्या ठसठशीत व भरघोस भाषाशैलीनें नटलेलें आहे. परंतु त्यांतले त्यांत ‘ उपेक्षितांचें अंतरंग ’ व त्यानंतरचे कथासंग्रह यामध्यें प्रा. बापूसाहेब यांची काव्यप्रतिभा विशेष बहरानें फुललेली दिसते. मूळचा कथेचा गोडवा, रेखीव स्वभावाचित्रण, खेडेगावांतलि स्वाभाविक पार्श्वभूमि, अचुक मनोविश्लेषण व आकर्षक शेवट यांनीं या कथावाङ्मयाबद्दल वाचकांमधे एक निराळीच उत्कंठा निर्माण केली आहे. तारुण्यांतील सतेज अंगलटींत जशी पेशीपेशींत किंवा रोमारोमांत कांति भरुन राहिलेली असते व त्याचें साकल्यानें दिसणारें सौन्दर्य जसें ठाशीव वाटतें, तशीच स्थिति प्रा. बापूसाहेबांच्या शैलीची आहे. आणि ‘ माणुसकीचा गहिंवर ’ या पुस्तकांतहि त्यांतलें सौंदर्य कमी झालेलें नाहीं. म्हणूनच त्यांचें ‘ शैलीकार ’ हें विशेषण मराठी वाङ्मयांत चिरंतन व त्यांना भूषणभूत झालेलें आहे.

प्रा. बापूसाहेब यांची कथा सांगण्याची एक अभिनव पद्धत आहे. कथेला सुरवात ते अगदीं साध्या वाक्यानें करतात, पण तीत कथानकाचे, प्रसंगाचे, घटनाचे धागेदोरे जेव्हां आपलें विणकाम करूं लागतात तेव्हां तिला एकाद्या रेशमी महावस्त्राचें स्वरूप येऊं लागतें. बीजाला जसे कोंभ फुटावेत त्याप्रमाणें त्यांच्या प्रतिमेला कोंभ येतात. त्यांच्या प्रतिभेचा दुसरा विशेष हा आहे कीं, त्यांच्या कथा या सत्यसृष्टीच्या मालमसाल्यावर आधारल्या असून त्यावर ध्येयसृष्टीचे ताजमहाल उभारलेले असतात. त्यामुळे कथेमधे वास्तव व ध्येय यांचा एकजीव रांधा झालेला आढळतो. मला तर या कथांतील पात्रें कुठे तरी पाहिल्यासारखींच वाटतात. यांतील प्रसंग कानावरून गेल्याचा भास होतो व एकाददुसरी घटना प्रत्यक्ष पाहिल्याचेंहि स्मरतें. ‘ उपेक्षिताच्या अंतरंगांतील ’ पिऱ्या दरवडेखोर, ‘अनामिकें’तील ‘ टोळधाड ’ किंवा ‘माणुसकीचा गहिंवर’मधील शंकर ( शंभू शिखरीचा राजा ), रामभरोसी नोकरीत होता तो बंगला, ‘ माझे दहन तुम्ही करा ’ मधील धनाजी, गणु हलवाई या व्यक्ति व प्रसंग ओळखीचे वाटतात. प्रा. बापूसाहेब यांनीं मूळच्या ओबड धोबड कथावस्तूवर चतुराईनें रंधा मारला आहे व त्याला रेखीव स्वरुप आणून तिला योग्य स्थानीं ठेवून मगच त्याचें वाचकास दर्शन घडविलें आहे. हुशार सराफ आपले मोतीदाणे तळहातावर घेऊन गिऱ्हाइकास दाखवीत नाहीं. तो ते सुंदर तांबडया फडक्यावर ठेवून गिऱ्हाइकापुढें करतो. तसेंच प्रा. बापूसाहेब यांनीं मुळाला सजवून आपल्या कथा पुढें केल्या आहेत.

मागील कथासंग्रहाप्रमाणें या संग्रहांतील काहीं पात्रें मराठी कथासृष्टींत अभिजात व नमुनेदार म्हणून राहतील यांत शंका नाहीं. उदाहरणार्थ 'शंभु शिखरीच्या राजां'तील पार्वती, रामभरोसी, तायडी, नरहरी व सुंदराताई व गणु हलवाई हीं पात्रें नेहमीं समाजांत वावरणारीं व ठळकपणें नजरेंत भरणारीं आहेत. आपल्या भोंवतालच्या आपल्यासारख्याच मध्यम वर्गांतून किंवा खालच्या वर्गांतून तीं वेचून घेतल्यामुळें त्यांच्याबद्दल आपणांस जन्-नांतरीची जवळीक वाटते.

प्रा. बापूसाहेब यानीं इतर पुस्तकाप्रमाणें या पुस्तकांतहि कथेव्यतिरिक्त दुसरें एक दोन लेखनप्रकार समाविष्ट केले आहेत. त्यांना ते कदाचित् 'गोष्टी' किंवा 'कथा' असें संबोधीत असतील, पण मला मात्र ती 'गद्यकाव्यें' किंवा 'शब्दचित्रें' वाटतात. त्यांत कथेचें असें स्वरूप थोडें वाटतें. उदाहरणार्थ 'भीवरेच्या तीरावरील दोन देव' यांत कथा, गद्यकाव्य व तात्त्विक चर्चा यांचे मिश्रण आहे, तर 'मंगळवेढ्याचें कुसूं' यांत कथा व तात्त्विक चर्चा आहे; तसेंच 'गणू हलवाई' किंवा 'शेवंतीचा खराटा' हें निव्वळ शब्दचित्र वाटतें तर 'अजान वृक्षाच्या सावलींत' हें निव्वळ गद्यकाव्य वाटतें. आपल्या रसगुणामधे हीं रतिभरहि कमी नाहींत; पण त्या कथा नव्हत एवढें वाटतेंच. म्हणून प्रा. बापूसाहेब यांनीं शब्दचित्रें, गद्य काव्यें व कथा यांचे वेगवेगळे संग्रह केले तर त्यांच्या एकजिनसीपणानें त्यांचें स्वरूप याहूनहि उठावून दिसेल व त्यांचें मराठी लेखनप्रकारांत एक विशेष स्थान ठरेल.

तथापि 'भीवरेच्या तीरावरील दोन देव' 'मंगळवेढ्याचें कुसूं' व 'अजानवृक्षाच्या सावलींत' यांतील व्यासंग, तत्त्वज्ञान, चिंतनशीलता, विचार मांडण्याची पद्धत व गोष्टी-सारखा ओघ कायम ठेवून मनाची पकड घेण्याची हातोटी प्रशंसनीय आहे. या लिखाणांतील शब्दांशब्दांतून पार होतांना त्यांच्यातील अष्ट सात्त्विक भावांचा आपणांस पदोपदीं प्रत्यय येतो.

प्रा. बापूसाहेब यांच्या मनाचा पाया सातारा जिल्ह्यांतील कणखर संस्कारांनीं भरला गेला आहे व त्यावर विद्या, व्यासंग, अनुभव, प्रवास वगैरे बाहेरच्या व्यापक संस्कारांनीं टोलेजंग हवेली उठविली आहे. वृद्धापकाळीं मनाला जोरदार कोंभ वा धुमारे फुटणें हें त्याच्या तरुणपणाचें द्योतक आहे. यांतूनच त्यांच्या मनाचा बहर फुलून येतो. त्यांच्या व्यापक सहा-नुभूतीस असेच अनेक 'गहिंवर' येवोत व त्यांच्या मौलिक विचारांतून तरुण पिढीचें जीवन सकस होवो असें 'माणुसकीचा गहिंवर' वाचल्यावर म्हणावेसें वाटतें.

(प्रा.) शं. के. कानेटकर.

**प्रमिला बेन** ( कादंबरी )—

ले.—रामतनय. प्रका.—अ. अं. कुलकर्णी, कॉंटिनेण्टल प्रकाशन, १९६।१९ सदाशिव, पुणें २. किं चार रु.

"मोहित्याची मंजुळा" ह्या कादंबरीनें १९३१ पासून मराठी वाचकांच्या परिचयांत आलेले श्री. रामतनय यांची ही पांचवी कादंबरी. त्यांच्या वाचकांनीं आतां हा आडाखा मनाशीं बांधून ठेवलाच आहे कीं रामतनय यांच्या कथेचा उगम व परिपोष देशांतील जोर-दार आंदोलनांतून होत असतो; आणि 'प्रमिलाबेन' हातीं घेणाराला हाच अनुभव आल्याशि-वाय राहणार नाहीं

ह्याचा अर्थ त्या कृतींत प्रासंगिकताच असते असा मात्र नव्हे. प्रासंगिकतेच्या फेसा-खालीं कांहीं वास्तवता असते व तिच्या पोटीं कांहीं सत्य असेल कां, हें पाहण्याचा त्यांचा उद्देश असतो. तसाच प्रयोग ह्या कादंबरींत त्यांनीं करून दाखविला आहे. गुजराथी समाज, त्याची वणिग्वृत्ती, युद्धकालांत त्या वणिग्वृत्तीनें कठोरपणानें केलेली कमाल कमाई, भूमिगतांचा संचार, त्यानीं त्या वणिग्वृत्तीवर दिलेला उतारा, घेतलेला दलितांचा कैवार, त्यांची ती न्यायपद्धति, दरारा, या साऱ्यांतून कथानक घडलेलें व आकारास आलेलें आहे. मनोरंजन हेंच लेखकाचें निव्वळ ध्येय नसल्यानें कांहीं भाष्य व संदेश देण्याकडे त्यांचा ठायीं ठायीं कल झुकतो.

वणिग्वृत्तीनें खेडीं बुडून निघत आहेत, श्रमजीवी वर्ग उपासमारीनें पिडला जात आहे, शहराची धन होते; पण खरें व्हावयाला पाहिजे तें हें कीं, खेड्यांतला पैसा खेड्याच्या कामीं खेड्यांच्या उर्जितावस्थेसाठीं खर्ची पडला पाहिजे. खेडीं स्वावलंबी स्वयंपूर्ण झालीं पाहिजेत. ही एक बाजू. दुसरी बाजू अशी कीं, गुजराथी लोक व्यापारीवृत्तीमुळें धनाढ्य आहेत. त्यांच्या बुद्धीची घडणच त्या प्रकारची आहे. तर महाराष्ट्रीय पराक्रमी आहेत, न्यायप्रिय आहेत, मनानें उदार आहेत. तेव्हां, ह्या दोन जातींचा संगम झाला पाहिजे. ह्या द्विविध प्रतिपादनाच्या अनुरोधानें कथानकाची वीण घालत घालत लेखकानें शेवट गांठला आहे.

कादंबरी हेतुप्रधान असल्यामुळें तंत्र आणि कला ह्यांचा आविष्कार व्हावा तितका झालेला दिसत नाहीं. कारागिरी मध्यम प्रकारची आहे. उदाहरणार्थ, कथानकानें बराच पल्ला गाठल्यानंतर भूतकाळांतील धागेदोरे व एकंदर बैठक सांगण्यासाठीं चाळीस पन्नास पृष्ठें खर्चण्यांत आलीं आहेत. प्रमिलाबेन दिनचर्या लिहून ठेवित असे ह्या वस्तुस्थितीचा उपयोगहि अधिक चतुराईनें करण्यास वाव होता. कादंबरी एकंदरीनें चित्ताकर्षक आहे. सौंदर्य–दर्शन घडविण्याची पद्धति रमणीय आहे. ही सर्व रमणीयता अर्थातच मुळांतून पाहावयाला हवी. असल्या अभिप्रायांतून कुडच्या-ओंजळींनीं तो साक्षात्कार कितीसा घडविता येणार ?

* * *

**मायबोलीची कहाणीः—**

लें० – प्रो. ना. गो. नांदापूरकर. प्र० – अ. अं. कुलकर्णी, कॉंटिनेंटल प्रकाशन. १९६।१९ सदाशिव, पुणें–२. किं. दीड रु.

मराठवाडा साहित्यपरिषदेचें हें पहिलें पुष्प. कहाण्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण भाषाशैलीनें हें पुस्तक लिहिलें असून, ह्यांत मुकुंदराज, महानुभाव कवि, ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम आदि भाषाप्रभूंच्या वैभवाचें संकीर्तन करण्यांत आलें आहे. प्रो. पोतदार, प्रो. शं. दा. पेंडसे, श्री. माडखोलकर ह्या आधुनिक भाषाप्रभूंनीं प्रस्तुत पुस्तकाचा पुरस्कार केला आहे. [प्रो. पोतदार ह्यांनीं ह्या 'कहाणीची पाहणी' करतांना तीच जडण-घडण अनुकारिली आहे.] मायबोबोलीची बोलणी, करावी कोणी, मोंगलाईतल्या नांदापुरकांनीं. भले भले नांदापूरकर. तुम्ही कलमबहाद्दर, सांगितली कहाणी मनोहर. आमच्या मराठीची तुमची कहाणी मनोहर, अगदीं मधुर, जशी खडीसाखर, वर्णावी कोठवर. तुमचे थोर उपकार, सर्व जनांवर. असली कहाणी, कधी सांगितली नव्हती कोणी, तुमच्या आलें मनीं, आणि आमच्या आलें कानीं" ह्या प्रा. पोतदारांच्या शब्दानीं जसें पुस्तकाचें स्वरूप कळतें, तसेंच भाषेचें वळणहि कळतें. भाषेच्या ह्या धाटणींत समग्र पुस्तक लिहिलेलें आहे. असे यमकानुप्रास साधायचा सरास

कटाक्ष ठेवायचा म्हणजें थोडीबहुत कृत्रिमता येणें अपरिहार्य आहे. तेव्हां, पुस्तक एकाच बैठकींत वाचूं नये, म्हणजे कृत्रिमता जाणवणार नाहीं, खडीसाखरी भाषेच्या माधुरीनें तोंडाला मिठी बसणार नाहीं. दमादमानें पुस्तक वाचल्यास त्याचा रसास्वाद घेतां येईल; मन मुरडणार नाहीं.

* * *

**शिव्या आणि ओव्या ( लघुनिबंधसंग्रह )—**

ले.—बाळशंकर देशपांडे, साहित्यप्राज्ञ. एकमेव विक्रेतेः श्री समर्थ बुक डेपो, गिरगांव, मुंबई-४. किं. सव्वा रु.

प्रसिद्धाप्रसिद्ध सात लघुनिबंधांच्या ह्या संग्रहांत 'शिव्या आणि ओव्या' ह्या मथळ्याचा लघुनिबंध नाहीं, किंवा, शिव्या व ओव्या अलग-अलग नाहींत. शिव्या देणें आणि ओव्या गाणें ह्यांचा मिलाफ प्रत्येक लघुनिबंधांत झाला असून त्यांत प्रगट झालेली लेखकाची चातुरी विलोभनीय आहे. शिव्यांचा प्राकृत अर्थानें शोध मात्र कोणी घेऊं नये. "द्रव्याशेनें विद्यामंदिरांत शिरून तिथल्या पावित्र्याच्या, उदात्ततेच्या मूर्ति छिन्नविच्छिन्न करणाऱ्या गुरुमाउली पाहिल्या कीं, मला सोमनाथावर स्वारी करणाऱ्या गजनीच्या महमुदाची हटकून आठवण होत राहील." (२५). "आजच्या सुधारलेल्या विसाव्या शतकांतील विनोदाला लाभणारी लोकप्रियताहि त्यांतील मार्मिकतेपेक्षां माकडचेष्टेवर आणि व्यंजनेपेक्षां वाकुल्यावरच अधिक अशी अवलंबून नाहीं कां ?" (५०) ह्या प्रकारच्या उद्‌गारांतून शिव्याच दिलेल्या आहेत, नाहीं तर काय ? अर्थात असल्या शिव्या द्यायला किंवा प्रशस्तिरुप ओव्या गायला कल्पनेची तरलता हवी; आणि ती ह्या लघुनिबंधसंग्रहांत पानोपान दिसून येते.
शैलीच्या बाबतींत श्री खांडेकरांचें वळण प्रस्तुत लेखकानें गिरवलेलें दिसतें व लघुनिबंधाला तें शोभून दिसतें. पण त्या वळणाचें पर्यवसान "अधिक व्यवस्थित कायदे सरकारला कां करतां येऊं नयेत ?. यावर सरकारतर्फेचं उत्तर काय आहे तें मला ठाऊक नाहीं; पण कायदा हा गद्धा असतो आणि गीतेपेक्षां लायेंचच तत्वज्ञान ज्याला पटलेलं असतं, अशांत कोणीहि झालं तरी काय सुधारणा घडवून आणणार हें उघडच दिसतं !" (५५) असल्या क्लिष्टतेंत न होईल याबद्दल लेखकानें दक्षता घ्यावी. 'सरता लावला' ह्या लघुनिबंधाची शीव 'चोवीस तासांत गुण' ह्याच्या शिवेला भिडूं पाहात आहे. 'जिवाणूचं स्वप्न' ह्या लघुनिबंधाच्या समारोपांत तुकारामाच्या बैंडेजची छाया उमटायला हवी होती, अशी कलात्मक दृष्टीची अपेक्षा आहे. मुलांच्या दातांसंबंधीं जिथें विचारविलसित आलें आहे तिथें "कालिदास भवभूतिपेक्षां मला रामदासच अधिक वास्तववादी कवि वाटूं लागतो" (२२) असा लेखकानें अभिप्राय दिला आहे. ह्या विधानाचा अर्थ करूं गेल्यास—कालिदास भवभूति हे वास्तवादी आहेतच असें गृहीत धरून तुलनेंत रामदास त्यांच्यापेक्षां अधिक वास्तववादी ठरविण्यांत आला आहे, असे निष्पन्न होईल. पण लेखकाला कालिदास—भवभूति वास्तववादी आहेत असें खरोखरी सुचवायचें नसावें; आणि तसें सुचवायचें नसल्यास "कालिदास-भवभुतीपेक्षां मला वास्तववादी रामदासच अधिक पटतो" अशा आशयाचें विधान तिथें समुचित ठरलें असतें कां, ह्याचा लेखकानें विचार करावा; म्हणजे विधानें करतांना अभिप्रेत अर्थच्छटांची बारकाईनें चिकित्सा करणें जरूर आहे हें त्यांच्या ध्यानीं येईल. लेखनांत रमणीयता व जीवनाकडे पाहण्यांत उमदेपणा असल्यामुळें प्रस्तुत पुस्तक वाचून संपविण्याची ओढ लागते.

—य. दि. पेण्ढरकर

**इतिहासाचें वर्गीकरण—**

लें.:— कृ. शं. हिंगवे. बी. ए. डी. एल्. सी. (मद्रास) प्रका.:—चित्रशाळा प्रेस, पुणें २. किं. रु. १॥. ( पुणें ग्रंथालय संघ पुरस्कृत ग्रंथमाला, (.१ )

हिंदी संघराज्यांतील विश्वविद्यालयांत माध्यम म्हणून इंग्रजी भाषा असावी कीं नाहीं या विषयींचें मध्यवर्ती सरकारचें धोरण अद्यापि निश्चित झालेलें नसलें तरी प्रादेशिक विश्वविद्यालयांत प्रादेशिक भाषेलाच माध्यमाचें स्थान मिळावें अशी मागणी लोकांकडून जोरदारपणें पुढें मांडण्यांत येत आहे. तेव्हां आज ना उद्यां पुणें विश्वविद्यालयांत सर्व विषय मराठींतूनच शिकविले जातील हें ठरलेलेंच आहे. त्यांत अडचण यावयाची ती पाठ्य पुस्तकांची. ग्रंथालयशास्त्र हा विश्वविद्यालयांनीं शिकविण्याजोगा विषय असल्याचें आतां विद्वानांना मान्य झालेलें आहे. तेव्हां पुणें ग्रंथालयसंघाच्या श्री. हिंगवे, श्री. कोल्हटकर या कार्यकर्त्यांनीं या शास्त्रावरील पाठ्यपुस्तकें म्हणून वापरण्याजोगी ग्रंथरचना चालविलेली आहे ही गोष्ट अभिनंदनीय आहे. डेक्कन कॉ. पोस्टग्रॅज्युएट ॲन्ड रि. इन्स्टिटयूट या प्रसिद्ध संशोधन संस्थेंत ग्रंथालयाध्यक्ष म्हणून गेलीं दहा वर्षें काम करण्याचा अनुभव आल्यानें व पुणें ग्रंथालय संघानें चालविलेल्या ग्रंथालयशास्त्राच्या वर्गांत गेलीं तीन वर्षें प्रत्यक्ष शिकवत असल्यानें ग्रंथालयशास्त्रानुसार ग्रंथांचें वर्गीकरण कसें करावें या विषयावर लिहिण्याचा श्री. हिंगवे यांना दुहेरी अधिकार प्राप्त झालेला आहे.

त्यांच्या प्रस्तुत पुस्तकाचे पांच भाग असून त्यांत वर्गीकरणाची आवश्यकता व त्याचे चार मूलभूत नियम, वर्गीकरणाला अवश्य असणारे सहा तक्ते, इतिहासाच्या वर्गीकरणाचे विशेष नियम, तक्त्यांतील शब्दांची सूची व वर्गीकृत उदाहरणें अशी उपयुक्त माहिती आहे. या लहानशा पुस्तकांत इतिहासाच्या बावीस उपविभागांतील एकेक सत्तर ग्रंथ व नियतकालिकांचे स्थानांक दिलेले असून, सर्वच विवेचन उदाहरणांनीं सुगम करण्याचा यशस्वी प्रयत्न करण्यांत आला आहे हें त्यांचें उल्लेखनीय वैशिष्ट्य आहे. वर्गीकरणाचे नियम व उदाहरणें हीं डॉ. रा. सा. रंगनाथम् यांच्या ' विसर्ग ' ( : द्विबिंदु ) वर्गीकरण-पद्धतीला अनुसरून दिलेलीं आहेत.

ग्रंथालयशास्त्राची मराठी परिभाषा तयार करण्याचें कार्य मराठी साहित्य परिषदेनें पत्करून त्यासाठीं श्री. हिंगवे यांच्यासारखे ग्रंथालयशास्त्रतज्ज्ञ, कोशकार दाते, तत्वज्ञानाच्या मराठी परिभाषेवर ग्रंथ लिहिणारे प्रा. दे. द. वाडेकर व श्री. गो. कृ. मोडक इत्यादि विद्वानांची समिती नेमून आधिकृत परिभाषा निश्चित करीपर्यंत श्री. हिंगवे यांनीं दिलेले पारिभाषिक शब्द वापरण्यास हरकत नाहीं. मात्र पुस्तकाच्या प्रस्तावनेंत म. म. दत्तोपंत पोतदारांनीं सुचविलेला 'विसर्ग पद्धति' हाच शब्द Colon Classification ला समर्पक प्रतिशब्द म्हणून अवश्य योजिला जावा. महामहोपाध्यायांची सर्वच प्रस्तावना माहितीपूर्ण व विचारप्रवर्तक आहे. ' दशांश ' व ' विसर्ग ' ( : द्विबिंदु ) या ग्रंथवर्गीकरणाच्या दोन सर्वमान्य पद्धतीविषयीं थोडीशी सुद्धां सामान्य माहिती दिली नाहीं ही मोठीच उणीव या पुस्तकांत राहून गेली आहे. भाषेच्या दृष्टीनेंहि पुस्तकावर पुन्हा नजर फिरणें योग्य आहे. मुद्रणदोषहि आहेतच. दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं या गोष्टींकडे दुर्लक्ष होऊं नये.

ना. अ. गोरे

———

## साभार स्वीकार

१ शंभर वर्षांचा इतिहासः—(पुणें नगर वाचन मंदिर ) ले. ग. न. श्रीगोंदेकर; मूल्य ५ रु.

२ वाङ्मयीन मतें आणि मतभेदः- ले. वा. ल. कुलकर्णी, प्रका. के. भि. ढवळे, मुंबई ४; मूल्य ३ रु.

३ महाराष्ट्रीय संतमंडळाचें ऐतिहासिक कार्य—ले. वा. रं. सुंठणकर, प्रका. ए. पी. चौगुले, टिळक चौक, बेळगांव; मूल्य ४॥ रु.

४ मार्क्सवादाचें एक शतकः—ले. व प्रका. प्रा. अ. रा. कामत; १२ फर्ग्युसन कॉलेज, पुणें ४; मूल्य १ रु.

५ जे. कृष्णमूर्तिदर्शनः—( प्रवचनें ) ले. एन्. आर्. ढोले; प्रका. पां. रा. ढमढेरे, सदाशिव, पुणें २; मूल्य १॥ रु.

६ समाजशास्त्र—ले. गो. स. घुर्ये; प्रका. आर्यसंस्कृति मुद्रणालय; पुणें २ मूल्य १॥ रु.

७ आरोग्यमंजरी—ले. गो. अ. ताम्हनकर; प्रका. स्वाधीन साहित्य संस्था, पुणें २; मूल्य २॥ रु.

८ रुखरुख—ले. वा. शि. आपटे; प्रका. स्वाधीन साहित्य संस्था, पुणें २; मूल्य १॥ रु.

९ व्यवहार आणि शिष्टाचार—(२ री आवृत्ति) ले. व प्रका. श्री. शा. हणमंते, गोगटे बंगला, सोलापूर; मूल्य ३ रु.

१० अपौरुषेय वाङ्मय अर्थात् स्त्री-गीतें—ले. डॉ. कमलाबाई देशपांडे; प्रका. मनोहर ग्रंथमाला, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य ३ रु.

११ अमरपक्षी—(कविता) श्री. वि. स. पागे; प्रका. नवभारत प्रकाशन लि. मिरज; मूल्य १२ आणे.

१२ गीतानिर्वाण—( कविता ) ले. राजकवि काळेले; प्रका. त्रिं. अ. माईणकर, १४ इमली बाजार, इंदूर; मूल्य १ रु.

१३ गुंजन—( कविता ) सौ. उषा सुलाखे; प्रका. स्वाधीन साहित्य संस्था, पुणें २; मूल्य १॥ रु.

१४ कविताविलास—( कविता ) श्री. ल. ना. दारशेतकर; प्रका. य. गो. जोशी, ६२३।१५ सदाशिव, पुणें २; मूल्य १२ आणे.

१५ छाया—( कविता ) सौ. संजीवनी मराठे; ठळकवाडी, बेळगांव; मूल्य २॥ रु.

१६ स्वेदगंगा—( कविता ) श्री. विंदा करंदीकर; प्रका. प्रा. करंदीकर, रत्नागिरी; मूल्य ३ रु.

१७ प्रतिबिंब—( कविता ) ले. वा. कृ. परांजपे; प्रका. य. गो. जोशी, सदाशिव, पुणें २; मूल्य २ रु.

१८ आर्द्रा—( कविता ) प्रा. य. द. भावे; प्रका. अजित एजन्सी, टिळक चौक, बेळगांव; मूल्य २ रु.

१९ ग्वाल्हेर—ले. पाठक- पिंगळे; प्रका. श्रीसयाजी बालज्ञानमाला, बडोदें; मूल्य ८ आणे.

२० मक्या कळ्या—( कथासंग्रह ) श्री. द. र. कवठेकर; प्रका. देशमुख आणि कं. शनिवार, पुणें २; मूल्य १। रु.

२१ चोपडे येथील श्रीवेताळ व श्री खळनाथ—ले. रा. ना. केळकर; प्रकाशक श्रीकृष्ण गोपाळ आणि कं. सदाशिव, पुणें २;

२२ श्रीसत्यनारायण— ( संवाद व पोवाडा ) ले. रामभाऊ भोगे; प्रका. ग. का. रायकर, भावबाची वाडी, मुंबई २; मूल्य ४ आणे.

# परिषद्वार्ता

( चिटणीसांकडून )

**विनंतीः**—नवीन वर्षाची पहिली तिमाही संपली आहे. ज्यांनी अद्याप १९४९–५० ची वर्गणी पाठविली नाही त्या सभासदांनी आपली वार्षिक वर्गणी रु. ३ म. ऑ. ने अगर अन्य रीतीने कार्यालयाकडे पाठवावी. मागील वर्षाची बाकी असल्यास तीहि कृपा करून पाठवावी.

**स्मृतिदिनः**—ज्ञानकोशकार कै. श्रीधर व्यंकटेश केतकर यांचा स्मृतिदिन १० एप्रिल १९४९ रोजीं सकाळीं त्यांच्या समाधिस्थानीं साजरा झाला. प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या हस्ते पूजाअर्चा करण्यांत आली.

**सत्कारः**—संमेलनाध्यक्ष आचार्य शं. द. जावडेकर यांचा बुधवार दि. २७।४।४९ रोजीं कार्याध्यक्ष प्रा. श्री. म. माटे यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार करण्यांत आला. प्रा. क्षीरसागर, प्रा. निरंतर व श्री. गोपीनाथ तळवळकर यांनी आचार्यांच्या संबंधीं गुणगौरवपर भाषणें केलीं. याच प्रसंगानंतर कै. काकासाहेब लिमये यांच्या तैलचित्राचें अनावरण आचार्य जावडेकरांचे अध्यक्षतेखाली करण्यांत आलें.

**पुणें येथे भरलेलें ३२ वें महाराष्ट्र साहित्य संमेलनः**— पुणें नगर वाचन मंदिर या संस्थेने दिलेल्या निमंत्रणानुसार प्रस्तुत संमेलनाचें अधिवेशन आचार्य शंकर दत्तात्रय जावडेकर यांचे अध्यक्षतेखाली 'केळकर सभागृहा'त शनिवार दि. १४ मे रोजीं सायंकाळीं ६ वाजता अत्यंत उत्साहपूर्ण वातावरणात सुरू झालें. व्यासपीठावर माजी संमेलनाध्यक्ष प्रा. न. र. फाटक, संमेलनाध्यक्ष आचार्य जावडेकर, स्वागताध्यक्ष म. म. प्रा. द. वा. पोतदार, संमेलन–कार्याध्यक्ष श्री. चिं. ग. कर्वे व संमेलनाचे प्रमुख पदाधिकारी बसले होते. उपस्थित श्रोतृवर्गात आचार्य भागवत, साने गुरूजी, आचार्य अत्रे, श्री. अनंत काणेकर, श्री. प्रभाकर पाध्ये, श्री. वि. द. घाटे, महर्षि कर्वे, सेनापति बापट, रावसाहेब पटवर्धन, रँग्लर परांजपे,

## साभार स्वीकार—

२३ **श्रीधरस्वामी निगडीकर चरित्र**—ले. व प्रका. अ. गो. वकील, हिंगणीकर, पो. मुर्शिदपूर, जिल्हा बीड ( निजाम ); मूल्य ४ आणे.

२४ **मोत्यांची शिकार**, अॅल्युमिनियम, छान छान गांवी, नोट कुणाची, बच्चोंके गीत (बालविहारमाला) प्रका. दा. ना. मोघे, कोल्हापूर; मूल्य ४ ते ६ आणे.

२५ **नियतकालिकें**—पराग ( ज. ए. इन्स्टि. मो. ह. हायस्कूल, ठाणें ), सेवा ( ज. ए. इन्स्टि. गर्लस् हायस्कूल, दादर ), न्यू. इं. स्कूल, सातारा, कोंकण एज्यु. सो. अलिबाग.

२६ **पहांटवारा** ( कविता )— कवि व प्रका० वि. म. कुलकर्णी, गोंधळीगल्ली, बेळगांव; मूल्य २ रु.

श्री. अण्णासाहेब भोपटकर, प्रा. पुणतांबेकर, श्री. शं. वा. किर्लोस्कर, सौ. मालतीबाई दांडेकर, सौ. संजीवनी मराठे, शांता शेळके, श्री. पु. दि. ढवळे, डॉ. शं. दा. पेंडसे, श्री. चिं. वि. जोशी इत्यादि अनेक लहानथोर साहित्यिक होते. संमेलनास लोकनायक अणे, पंतप्रधान बाळासाहेब खेर, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, बॅ. नाईक (हैद्राबाद), फलटण-इंदूरचे संस्थानाधिपति इत्यादिकांकडून शुभसंदेश आले होते. ईशस्तवन, स्वागतपद्य, संदेशवाचन, स्वागताध्यक्षांचें भाषण, अध्यक्षीय सत्कार, इत्यादि झाल्यावर अध्यक्षीय भाषण झालें. रात्रीं करमणुकीचे विविध कार्यक्रम झाले. विद्यार्थ्यांचे नाट्यप्रवेश, 'पारध' नाटिका, रोहिणी भाटे यांचें नृत्य, श्री. भोंडे यांच्या नकला हे कार्यक्रम विशेष उल्लेखनीय होते. दुसरे दिवशीं सकाळीं प्रा. श्री. बा. रानडे यांच्या अध्यक्षतेखाली कवि-संमेलन सुरू झालें. स्वागताध्यक्षपदीं श्री. वि. द. घाटे यांची नियुक्ति झाली होती. या प्रसंगीं निरनिराळ्या कवींचें कवितावाचन, कवितासंग्रहांचें प्रकाशन व 'आधुनिक काव्य प्रगतीपथावर आहे काय ?' या विषयावर चर्चा झाली. कविसंमेलनास श्री. बा. सी. मर्ढेकर, श्री. वा. रा. कान्त, श्री. मनमोहन, प्रभृति कविजन उपस्थित होते. प्रसिद्ध गुजराथी कवि श्री. उमाशंकर जोशी व श्री. स्नेहरश्मि यांना मुद्दाम निमंत्रणें पाठविलीं होती. त्यांची उपस्थिति हीं विशेष उल्लेखनीय गोष्ट होय. त्यांनीं काव्यविषयक मतें संमेलनात व्यक्त केलीं. संध्याकाळी खुल्या अधिवेशनांत रविकिरण मंडळास पंचवीस वर्षे पूर्ण झाल्याबद्दल मंडळाच्या सदस्यांचा सत्कार करण्यांत आला. रात्रीं 'संशयकल्लोळ' नाटकाचा प्रयोग झाला. तिसरे दिवशीं सकाळीं ग्रंथकार, लेखक व प्रकाशक यांच्या परस्पर संबंधासंबंधी मनोरंजक व बोधप्रद चर्चा झाली. स्त्री-विषयक आधुनिक मराठी वाङ्मयासंबंधींहि महिला साहित्यिकांनीं चर्चा केली. सायंकाळी ठरावांवर भाषणें झालीं. अध्यक्षांनीं समारोपाचें भाषण केलें व सरचिटणीस श्री. वि. त्र्यं. शेटे यांनी आभारप्रदर्शनाचें कार्य केल्यावर अधिवेशन संपलें.

रात्रीं 'तोतयाचें बंड' या नाटकाचा प्रयोग पावसामुळे अर्ध्यावर बंद करावा लागला. संमेलनास आलेल्या पाहुण्यांकरितां सुप्रसिद्ध गायिका श्री. मोगुबाई कुर्डीकर यांचें गायन व एक बोलपट असे दोन कार्यक्रम मुद्दाम ठेवण्यात आले होते. संमेलनाला जोडून 'महाराष्ट्र दर्शन', चित्रप्रदर्शन भरविण्यांत आलीं होतीं.

संमेलन कालावधींत परिषदेची वार्षिक साधारण सभा प्रा. न. र. फाटक यांच्या अध्यक्षतेखाली भरून दुरुस्ती-ठराव, इतिवृत्त-जमाखर्च-अंदाजपत्रक-मान्यता इत्यादि कामें झालीं. प्रा. माटे यांनीं कार्याध्यक्षपदाचा दिलेला राजीनामा मंजूर करण्यांत आला. विषय-नियामक समितीच्या तीन वेळा सभा भरून निरनिराळ्या ठरावांवर चर्चा होऊन ते संमत करण्यांत आले. ठराव अंकांत अन्यत्र दिले आहेत.

संमेलन यशस्वी करण्याचे कामीं नगर वाचन मंदिराचे सरचिटणीस श्री. वि. त्र्यं. शेटे, श्री. ग. न. श्रीगोंदेकर, प्रा. रा. शं. वाळिंबे, प्रा. चंद्रकुमार डांगे, श्री. वा. रा. होनप, श्री. रा. कृ. शिंदे, श्री. य. धों. ओगले, श्री. वि. शा. काळे, श्री. ल. ग. देशपांडे प्रा. सौ. शेंडे, सौ. विजया पेंडसे, कु. सरोजिनी बाबर प्रभृति कार्यकर्त्यांनी अमूप परिश्रम घेतले. प्रा. वा. गो. मायदेव व श्री. म. दा. साठे यांनींहि बहुमोल साहाय्य केलें. संमेलनाच्या यशस्वितेत आणखीहि अनेकांचे अनेक तऱ्हेचे श्रम खर्ची पडले आहेत. परिषद् त्या सर्वांची अत्यंत ऋणि आहे.

———

# ३२ व्या महाराष्ट्र साहित्य संमेलनात संमत झालेले
# ठराव

१. संमेलनात पुढील साहित्यिक व साहित्यप्रेमी यांच्या निधनानिमित्त दुखवटा ठराव संमत करण्यात आले.

ल. ना. जोशी, व्ही. के. भागवत, राजेसाहेब शंकरराव अप्पासाहेब पटवर्धन, ना. मु. गुप्ते, न. चिं. केळकर, ग. ह. केळकर, अ. बा. गजेंद्रगडकर, अं. गो. पुणतांबेकर, ना. वि. कुलकर्णी, वि. ल. बर्वे, बाबूराव साळवेकर, काशीबाई कानिटकर, गो. गो. मुजुमदार, कृ. ग. लिमये, श्री. ना. कोल्हटकर, पां गो. रनडे, वत्सलाबाई घाटे, चिं. नी. जोशी, के. ल. ओगले, श्री. ना. कर्नाटकी, कृ. प्र. खाडीलकर, प्रज्ञानेश्वर यति, रघुनाथराव सबनीस, माधवराव जोशी, द. आ. तुळजापूरकर, प्रमिलाबाई ओक, घाटगे, के. बा. गजेंद्रगडकर, रा. का. शिरोडकर, भा. व. भोपटकर, के. आ. पाध्ये, वा. का. किर्लोस्कर, शं. प. जोशी, वि. कृ. नेरुरकर, अवंतिकाबाई गोखले, लीलाबाई पटवर्धन, स. गो. श्रोत्री, रा. शं. राजवाडे, सीतारामपंत मनाठकर, बाबासाहेब सोमण.

२. बेळगांव येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनांत संयुक्त महाराष्ट्रासंबंधी जो ठराव करण्यांत आला व त्यानंतर ज्या संयुक्त महाराष्ट्र परिषदा भरून संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेसाठी ठराव झाले, त्यांना हें संमेलन पुन्हा दुजोरा देत आहे. घटना समितीच्या अध्यक्षांनी नेमलेलें दार कमिशन व राष्ट्रीय सभेने नेमलेली पट्टाभिसमिति या दोन्हींचे अहवाल हिंदी लोकशाहीच्या प्रगतीची व विकासाची संपूर्ण गळचेपी करणारे व हिंदुस्थानांतील बड्या भांडवलदारांच्या हितसंबधांचें रक्षण करणारे आणि हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भाषिकांच्या न्याय्य हक्कांची गळचेपी करून हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भाषिकांत वैमनस्य माजविणारे असल्यामुळे व महाराष्ट्राबद्दल त्यांत विकृत विधानें असल्यामुळे ही सभा त्या अहवालांचा तीव्र धिक्कार करीत आहे.

उत्तर कोंकण, डांग, छिंदवाडा, बेळगांव, कारवार वगैरे महाराष्ट्राच्या सीमाप्रांतांतील मराठी भाषिकांवर जें आक्रमण होत आहे त्याचा हें संमेलन निषेध करतें; सीमाप्रांतांतील यासंबधी जे जे भाषाविषयक प्रश्न उत्पन्न झाले आहेत किंवा होतील ते लोकशाहीच्या पद्धतीने सोडविण्याचे नेटाचे प्रयत्न महाराष्ट्र साहित्य परिषदेने करावे असा आदेश हें संमेलन परिषदेस देत आहे.

३. कित्येक वर्षांपासून म. सा. संमेलन आणि परिषद ज्या महाराष्ट्र विद्यापीठाच्या निर्मितीसाठी प्रयत्न करीत होतीं तें विद्यापीठ आतां कायदेशीर स्थापन झालें आहे, याबद्दल या संमेलनाला अतिशय आनंद होत आहे.

प्रस्तुत विद्यापीठाच्या निर्मितीबद्दल मुंबई सरकार आणि विशेषतः पंतप्रधान बाळासाहेब खेर यांचें हें संमेलन मनःपूर्वक आभार मानीत आहे. तसेंच पुणें विद्यापीठाचे आजचे व पहिले कुलगुरु नेक नामदार जयकर यांनीं हें विद्यापीठ सुरू करण्यासाठी व त्याच्या

स्थापनेनंतरहि जें बौद्धिक व शारीरिक श्रम केले व विद्यापीठाची सर्व व्यवस्था लावून दिली आणि देत आहेत याबद्दल सर्व महाराष्ट्रीय जनता त्यांची अत्यंत ऋणी आहे.

नवीन स्थापन झालेलें पुणें विद्यापीठ हें महाराष्ट्र संस्कृति, इतिहास आणि प्रकृति यांची चांगली जोपासना करणारें व्हावें व महाराष्ट्राची सर्वांगीण उन्नति होण्याला त्याची मदत व्हावी अशी या संमेलनाची तीव्र इच्छा आणि अपेक्षा आहे. तेव्हा या विद्यापीठाने शिक्षणाचे विषय, माध्यम आणि परीक्षापद्धति यांत योग्य ती सुधारणा ताबडतोब करावी अशी आग्रहाची सूचना आहे.

पुणें विद्यापीठ व मराठी भाषिक सर्व जनता यांना जोडणारा अधिकृत दुवा या दृष्टीने म. सा. परिषदेचें स्थान आहे व त्यादृष्टीनें विद्यापीठानें व मुंबई सरकारनें वेळोवेळीं महत्वाच्या प्रश्नांच्या बाबतींत म. सा. परिषदेचें सहकार्य घ्यावें अशी संमेलनाची शिफारस आहे.

४. महाराष्ट्रांत दोनतीन ठिकाणीं मराठी कार्यक्रमासाठीं नभोवाणी केंद्रें असणे अत्यंत आवश्यक आहे. असें असूनहि हिंदुस्थान सरकारच्या भावी योजनेंत महाराष्ट्रांत कोठेहि केवळ मराठीसाठी स्थान नाहीं याबद्दल संमेलनाला खेद वाटत आहे.

अहमदाबाद आणि धारवाड हीं अनुक्रमे गुजराथी आणि कानडी भाषेची नभोवाणी केंद्रें ठरलीं असल्याने महाराष्ट्रांतील प्रमुख ठिकाणीं मराठीसाठी केंद्र राखून ठेवणें क्रमप्राप्त आहे. तेव्हां सरकारने याचा अवश्यमेव विचार करावा व लवकरच मराठीसाठी स्वतंत्र नभोवाणी केंद्रें द्यावी अशी विनंती आहे.

त्याचप्रमाणें मुंबई, औरंगाबाद व नागपूर येथें असणारी नभोवाणी केंद्रें मराठी भाषिकांच्या प्रांतांत असल्यामुळे त्या केंद्रांवर सर्वस्वी मराठी कार्यक्रम असणें आवश्यक आहे. याचाहि मध्यवर्ती सरकारने अवश्य विचार करावा.

५. महाराष्ट्र साहित्य परिषद् घेत असलेल्या सर्व परीक्षांना मुंबई, मध्यप्रांत सरकार आणि मुंबई, पुणें, आणि नागपूर विद्यापीठांनी मान्यता द्यावी.

६. बहुसंख्यांकांच्या भाषेंतच सरकारने सर्वत्र व्यवहार करावा, सरकारी अहवाल—पत्रकें—ग्रंथ छापावेत व न्यायालयें व सरकारी कचेऱ्या यांतून हीच भाषा वापरली जावी.

७. मुंबई सरकारने पुणें येथे प्रादेशिक ग्रंथालय स्थापून या ग्रंथालयाच्याद्वारें महाराष्ट्रांत सर्वत्र मुक्तद्वार ग्रंथालयें सुरू करण्याचा प्रारंभ केला याबद्दल हें संमेलन सरकारचे अभिनंदन करतें.

८. मुंबई सरकारने " बॉंबे गॅझेटियर"ची नवीन आवृत्ति तयार करण्यासंबंधीं केलेली योजना अभिनंदनीय आहे. याबाबतींत हें संमेलन सरकारला अशी शिफारस करतें कीं, मराठी जिल्ह्यासंबंधींचे ग्रंथ मराठींतहि प्रसिद्ध व्हावेत व त्याकामीं आतापर्यंत उपलब्ध झालेल्या नवीन माहितीचा उपयोग करावा.

९. महाराष्ट्र ज्ञानकोश मंडळानंतर महाराष्ट्र कोशमंडळाने गेलीं वीस वर्षे तसेंच कोशकार्य चालवून महाराष्ट्र शब्दकोश, महाराष्ट्र वाक्संप्रदायकोश व शास्त्रीय परिभाषाकोश हे तीन मोठाले कोशग्रंथ प्रसिद्ध केले याबद्दल हें संमेलन चालकांचें अभिनंदन करतें. शिवाय चरित्रकोश, व्युत्पत्तिकोश व व्यायामकोश यांच्याहि संपादकांचें हें संमेलन अभिनंदन करतें.

१०. नागपूर विद्यापीठानें या वर्षापासून कॉलेजच्या अध्यापनांत मराठी व हिंदी माध्यम सुरू केल्याबद्दल हें संमेलन विद्यापीठाचें हार्दिक अभिनंदन करतें.

११. मुंबई सरकारने मोडी लिपीचा अंतर्भाव अभ्यासक्रमांत केल्याबद्दल या संमेलनास समाधान वाटत असून त्याबद्दल हें संमेलन मुंबई सरकारचें अभिनंदन करतें.

१२. महाराष्ट्रांतील जुनी मराठी संस्थानें विलीन झाल्याकारणाने संस्थानांचे ऐतिहासिक दप्तरांसंबंधी मोठी चिंता उत्पन्न झाली आहे. तीं लवकर सरकारी दप्तरखान्यांत, भारत इ. सं. मंडळ किंवा अन्य संस्थेंत पोचतीं होऊन त्यांची जोपासना व्हावी व हीं महाराष्ट्राच्या इतिहासाचीं अस्सल साधनें नष्ट होऊं नयेत याकडे मुंबई सरकारने तात्बडतोब लक्ष द्यावें अशी या संमेलनाची सरकारला विनंती आहे.

१३. मराठी भाषेतील शुद्धलेखनांत सांप्रत एकवाक्यता दिसून येत नाही. त्यामुळे मराठी भाषेची हानि होत आहे व मराठी अभ्यासकांची कुचंबणा होत आहे. त्यासाठी संमेलन अशी शिफारस करीत आहे कीं, परिषदेने पुरस्कृत केलेलें शुद्धलेखन विद्यापीठांनीं व प्रांतिक सरकारांनी मान्य करावें व तदनुसार विद्यापीठांचीं व सरकारांचीं प्रकाशनें प्रसिद्ध व्हावीं.

१४. भेदांत अभेद, विविधतेंत एकत्व हीं भारतीय संस्कृतींतील वैशिष्ट्यें आजच्या परिस्थितींत लुप्त झाल्यासारखीं वाटत आहेत. त्या संस्कृतीचें पुनरुज्जीवन व्हावें, एकभारतीयत्वाची जाणीव निर्माण व्हावी म्हणून प्रांतभारती ही संस्था अस्तित्वांत आणण्याची जी योजना श्री. सानेगुरुजी इत्यादि कार्यकर्ते करीत आहेत तीबद्दल या संमेलनाला समाधान वाटत असून त्या योजनेला सर्वांनी पाठिंबा द्यावा व ही योजना मूर्त स्वरूपांत आल्यावर सरकारने तिला साहाय्य करावें अशी या संमेलनाची विनंती आहे.

१५. श्रेष्ठ साहित्यिकांनी केलेल्या साहित्यसेवेबद्दल त्यांचा पारितोषिकपूर्वक गौरव होणें आवश्यक आहे, म्हणून हें कार्य पार पाडण्यासाठी सरकारने निरनिराळ्या साहित्य-संस्थांना दरवर्षी आर्थिक साहाय्य द्यावें अशी या संमेलनाची मुंबई सरकारला विनंती आहे.

१६. मराठी वाङ्मयांतील सर्वश्रेष्ठ ग्रंथराज ज्ञानेश्वरी या ग्रंथाचा ११ वा हीरकमहोत्सव १९५० सालीं सर्व महाराष्ट्रांत व्यापक प्रमाणांत साजरा व्हावा असा या संमेलनाचा सर्व साहित्य, वाङ्मयीन व शैक्षणिक संस्थांना आदेश आहे.

१७. पुणें विद्यापीठाच्या क्षेत्रांतून बेळगांव व कारवार या जिल्ह्यांतील मराठीभाषी भाग वगळल्याबद्दल आणि तो कर्नाटक विद्यापीठाच्या क्षेत्रांत घातल्याबद्दल या संमेलनास खेद वाटत आहे. या भागांतील महाविद्यालयांना (कॉलेजीसना) आपल्या इच्छेप्रमाणें दुसऱ्या विद्यापीठांना संलग्न होण्याची मुभा द्यावी अशी या संमेलनाची मुंबई सरकारला विनंती आहे.

१८. हल्लीं कांही वृत्तपत्रांत व नियतकालिकांत प्रसिद्ध होणाऱ्या कांही जाहिराती अश्लील, कामोत्तेजक, सदभिरुचीस बिघडविणाऱ्या व फसविणाऱ्या असतात व हजारो वाचक या जाहिरातींच्या आमिषांना बळी पडतात व समाज-पुरुषाचें अतिशय नुकसान होतें. (अ) अशा प्रकारच्या जाहिराती छापूं नयेत अशी हें संमेलन वृत्तपत्रें व नियतकालिकें यांच्या

चालकांना विनंती करीत आहे. ( आ ) अशा प्रकारच्या जाहिरातींवर कायद्याने योग्य नियंत्रण आणावें अशी हें संमेलन सरकारास आग्रहपूर्वक शिफारस करीत आहे.

१९. पुणें येथील "ज्ञानप्रकाश" दैनिकाला १०० वर्षे पुरी झालीं व त्याने १०१ व्या वर्षांत पदार्पण केलें याबद्दल हें संमेलन "ज्ञानप्रकाश" चें अभिनंदन करीत आहे.

२०. पुणें येथील नगर वाचन मंदिराला १०० वर्षे पुरा होऊन १०१ वें वर्ष लागलें याबद्दल हें संमेलन त्या मंदिराचें अभिनंदन करीत आहे.

२१. महाराष्ट्रांतील उच्च शिक्षण, संशोधन, कायदेमंडळें व कोर्टें यांतील कामकाज वगैरे व्यवहाराची भाषा मराठीच असली पाहिजे.

परंतु, या बाबतींत इंग्रजीला जें स्थान आहे तें हिन्दीला मिळावें अशी विधानें हिंदी भाषेचे कांही पुरस्कर्ते आज करीत आहेत. त्यांच्या या भूमिकेमुळे हिंदीबद्दल महाराष्ट्रांत विरोधाची भावना उत्पन्न होत आहे. या भावनेला वळी न पडतां हिंदीचा व इतर लोक-भाषांचा आदर व अभ्यास मराठी साहित्यिकांनी करणें इष्ट व आवश्यक आहे असें या संमेलनाचें मत आहे.

हिन्दी व इतर भारतीय लोकभाषांतील साहित्यसंस्थांशी घनिष्ट संबंध जोडणें निकडीचें आहे व त्यासाठी परिषदेने प्रयत्न करावे.

---

**म. म. प्रा. पोतदार यांचें स्वागताध्यक्षीय भाषण:**— गेल्या संमेलनप्रसंगीं म. म. पोतदार यांनी स्वागताध्यक्ष नात्याने केलेलें भाषण विद्यार्थ्यांनीं वाचावें, त्याचें मनन करावें या स्तुत्य हेतूने म. सा. परिषदेचे एक तळमळीचे हितकर्ते श्री. ना. ग. नारळकर यांनी रु. १०० ची उदार देणगी पाठवून वरील भाषण स्वतंत्र पुस्तिकेच्या रूपाने छापावें असें परिषदेला कळविलें. त्यानुसार राजगुरु छापखान्याचे व्यवस्थापक श्री. श्री. ज. गानू यांच्या सहकार्याने भाषणपुस्तिका छापून तयार झाल्या आहेत. निर-निराळ्या दुय्यम शाळांकडे त्या पाठविण्याची व्यवस्था लवकरच होईल. श्री. नारळकर, श्री. गानू इत्यादींची परिषद् फार ऋणी आहे.

× × ×

**परीक्षक-जागेसाठी अर्ज:**— परिषदेच्या वतीनें होणाऱ्या निरनिराळ्या परीक्षांचे वेळी परीक्षक म्हणून सेवाकार्य करण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनी परिषदेकडे ऑगस्ट-अखेरपर्यंत अर्ज करावेत. अर्जासाठी स्वतंत्र तक्ते नाहीत. अर्जात संपूर्ण नांव, पत्ता, शैक्षणिक पदव्या, पूर्वानुभव इत्यादींचा उल्लेख असावा.

× × ×

**सभासदांस विनंती:**—संयुक्त महाराष्ट्र कार्यासंबंधी नियामक मंडळाने समिति नेमलेली आहे. ज्या सभासदांस या बाबतींत कांही सूचना, मार्गदर्शन वगैरे करावयाची इच्छा आहे त्यांनी कार्यालयाकडे शक्य तितक्या लवकर कळवावें.

× × ×

## नवीन सभासद

कै. चिपळूणकर स्मारकासाठी देणगी दिल्यामुळे झालेले

### तहहयात

१ श्री. शं. वि. सहस्रबुद्धे, सिव्हिल सर्जन, जळगांव (पू. खा.)
२ श्री. हरी विनायक पाटसकर, चाळिसगांव (पू. खा.)
३ श्री. वसंत त्र्यंबक सोनाळकर, सरकारी वकील, अमळनेर (पू. खा.)
४ श्री. लिंबक विष्णु दीक्षित, वकील, धुळें (प. खा.)

### साधारण सभासद

१ प्रा. गंगाधर नारायण क्षीरसागर, प्रताप कॉलेज, अमळनेर (पू. खा.)
२ प्रा. काशिनाथ झुमकलाल लाड, प्रताप कॉलेज, अमळनेर (पू. खा.)
३ प्रा. रघुनाथ गोविंद सांगलीकर, प्रताप कॉलेज वसतिगृह, अमळनेर (पू. खा.)
४ प्रा. लक्ष्मण केशव कुलकर्णी, प्रताप कॉलेज, अमळनेर (पू. खा.)
५ प्रा. राजाराम सीताराम देशपांडे, प्रताप कॉलेज, अमळनेर (पू. खा.)
६ प्रा. वसंत चिंतामण दीक्षित, प्रताप कॉलेज, अमळनेर (पू. खा.)
७ श्री. दत्तात्रय दामोदर बागूल, प्रताप कॉलेज, अमळनेर (पू. खा.)
८ प्रि. वासुदेव पुरुषोत्तम दामले, प्रताप कॉलेज, अमळनेर (पू. खा.)
९ श्री. शंकर रंगो राणे, वकील, अमळनेर (पू. खा.)
१० श्री. यशवन्त बाळकृष्ण देशपांडे, शिक्षक दोंडाइचे (प. खा.)
११ श्री. विश्वनाथ मार्तंड बंगाली, वकील, अमळनेर (पू. खा.)
१२ श्री. यशवन्त शंकरराव गुते, वकील, अमळनेर (पू. खा.)
१३ श्री. मेघश्याम शंकरराव जहागिरदार, लाल दरवाजा, शालीबंडा, हैद्राबाद (दक्षिण)
१४ श्री. श्रीधर वासुदेव रामदासी, १२ कस्तुरचंद बिल्डिंग, पीलखाना, ब्राह्मणवाडी, हैद्राबाद (द.)
१५ श्री. भालचंद्र गोपाळ ब्रम्हे, प्रताप हायस्कूल, अमळनेर (पू. खा.)
१६ श्री. यशवन्त गोविंद हरताळकर, न्यू. इं. स्कूल, चोपडे (पू. खा.)
१७ श्री. भालचंद्र रंगनाथ बोपर्डीकर, पी. आर. हायस्कूल, धरणगांव (पू. खा.)
१८ श्री. धोंडो सखाराम कुलकर्णी, असि. डे. ए. इन्स्पेक्टर, अमळनेर (पू.खा.)
१९ श्री. विठ्ठल महादेव घुले, प्रायमरी ट्रे. कॉलेज, अमळनेर (पू. खा.)
२० रामचंद्र काशिनाथ कुलकर्णी, प्रताप विद्यालय, अमळनेर (पू. खा.)
२१ श्री. काशिनाथ प्रल्हाद पुराणिक, टाऊन हॉलजवळ, अमळनेर (पू. खा.)
२२ श्री. हरचंद गोविंद जाधव, जयकिसनवाडी, जळगांव (पू. खा.)
२३ श्री. नारायण कृष्ण जोशी, २२६ सदाशिव, पुणें २.
२४ सौ. शांताबाई सुरु, १९६।४ ड. टिळक रस्ता, पुणें २.
२५ श्री. नारायण रामदास वैद्य, मराठे–बंगला, गणेशवाडी, पुणें ४.
२६ श्री. अण्णाजी देवराव इनामदार, ४१६ नारायण, पुणें २.
२७ श्री नारायण विठ्ठल लेले, गोखले बिल्डिंग, टिळक रस्ता, पुणें २.
२८ श्री. मिठाराम गुणाजी भोळे, यावल (पू. खा.)

२९ श्री. मोरेश्वर दत्तात्रय ब्रम्हे, वकील, अमळनेर ( पू. खा. )

३० श्री. श्रीकृष्ण गोपाळ मुठे, वकील, अमळनेर ( पू. खा. ).

३१ श्री. सुमतिलाल चुनीलाल मर्चन्ट, वकील, अमळनेर ( पू. खा. ).

३२ श्री. सखाराम बळवंत निजसुरे, वकील, अमळनेर ( पू. खा. )

३३ श्री. नरहर वामन सराफ, वकील, अमळनेर ( पू. खा. ).

३४ डॉ. शंकर घोंडो चितळे, अमळनेर ( पू. खा. ).

३५ श्री. विष्णु विनायक आपटे, वकील, अमळनेर ( पू. खा. ).

३६ श्री. कृ. गं. मराठे, सिटी हायस्कूल, सांगली.

३७ श्री. क. श्री. काळे, वझे वाडा, मराठी शाळा नं. २ चे मागे, ( जुनी ) सांगली.

३८ श्री. भा. श्री. परांजपे, भोंसला लष्करी विद्यालय, नाशिक.

३९ श्री. माणिक केशवराव वैतुले, मंडल क्र. ७, महाल, नागपूर.

४० श्री. पांडुरंग बळवंत गाडगीळ, २५६ पंधे निवास, धंतोली, नागपूर.

४१ श्री. नारायण गोपाळ अलाटे, ३८ यादोगोपाळ पेठ, सातारा.

४२ श्री. यशवंत कृष्णाजी खाडिलकर, कांदेवाडी, मुंबई ४.

४३ श्री. पुरुषोत्तम वामन खेडकर, भडगांव ( पू. खा. ).

४४ श्री. सीताराम विष्णु गोखले, लिमयेवाडी, सदाशिव, पुणें २.

४५ श्री. दामोदर पांडुरंग रानडे, १९६।६६ टिळक रस्ता, पुणें २.

४६ श्री. नीळकंठ महादेव सिधये, ११९ शुक्रवार, पुणें २.

४७ श्री. प्रसन्नकुमार दामोदर अभ्यंकर, ६१६ शनिवार, पुणें २.

४८ श्री. अनंत रंगनाथ कानडे, ११४ शनिवार, पुणें २.

४९ श्री. निळकंठ अनंत ओक, १५९ क, नवी पेठ, पुणें २.

५० प्रा. रामकृष्ण नारायण गद्रे, ३१९ शनिवार, पुणें २.

५१ प्रा. अनंत नारायण गद्रे, २५२३बापट चाळ, वरली आळी, रत्नागिरी.

५२ श्री. शंकरसिंग भाऊसिंग परदेशी, ६५० शुक्रवार, शिवाजी रोड, पुणें २.

५३ श्री. रामचंद्र वासुदेव दाते, ७५९।३० डे. जिमखाना, पुणें ४.

५४ श्री. नरसिंह चिंतामण जोगळेकर, ६७७ शुक्रवार, पुणें २.

५५ श्री. सुरजमल शिवलाल गांधी, श्रीरामपूर (बेलापूर रोड), जि. अहमदनगर.

५६ श्री. रामचंद्र वामन कुलकर्णी, शिक्षक, विद्यामंदिर हायस्कूल, इस्लामपूर, ( सातारा ).

५७ श्री. बाळकृष्ण भार्गव मायदेव, मु. पो. सारंग, ता. दापोली, (जि.रत्नागिरी).

५८ दिवाकर कृष्ण केळकर, वकील, १२९ सुलतान बाजार, हैद्राबाद ( द. )

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

१ मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास (मानभावअखेर)
लेo— बा. अ. भिडे. मूल्य रु. १॥. सभासदांस रु. १ल्य. (ट. ख. नि.)

२ महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-अितिहास— लेo म. म. प्रा. द. वा. पोतदार
मूल्य रु. ३ सभासदांस रु. १॥ (ट. ख. निराळा).

३ प्राचीन पद्यवेंचे (प्राज्ञ परीक्षेस लावलेले)— मूल्य रु. २.

४ वाङ्मयीन समालोचन (१९४७) मूल्य रु. २. सभासदांस रु. १॥.

५ शुद्धलेखन नियम— मूल्य १ आणा. (ट. ख. निराळा)

महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-पुरस्कृत ग्रंथमाला, पुस्तक १ लें.

### वाङ्मयीन-वाद

लेखक— प्रा. श्री. के. क्षीरसागर, प्रा. रा. शं. वाळिंबे, श्री. बा. सी. म.कर, प्रा. म. गो. भाटे, श्री. दि. के. बेडेकर. पुरस्कार प्रा. रा. श्री. जोग. य. गो. जोशी प्रकाशनतर्फे प्रकाशित झालें. मूल्य रु. ३. सभासदांस रु. २ल्य (ट. ख. वेगळा)


मुद्रक— लक्ष्मण नारायण चापेकर, 'आर्यसंस्कृति मुद्रणालय,'
१९८/१७ सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणें २.

प्रकाशकः— वा. दा. गोखले, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.